॥ श्रीगुरुदेवदत्त ॥

# खडे तात्त्विक बोल.

"हरिस्मरणाविस्मरण तरि तुझें काय जिणें रे असून ॥ धृ० ॥
शरीर फिरवी तुजला मिरवी । देव असे रे रुसून ।
जवळी असून तुझें हृदयीं बसून । भगवंत नये रे दिसून ।
म्हणे सोहिरा गुरुनाथ हा । माझ्या हृदयीं घुसून ।
जनांसि उद्धरावयाकारणें । वचन सांगतो ठसून ॥

सोहिरोबा.


लेखक,

**महादेव हरि मोडक, बी. ए.**

नाट्यमकरंद, शीलनाथ, अष्टोत्तरी, मुग्ध आणि शांति ' या पुस्तकांचे कर्ते.


---


मुद्रक व प्रकाशक,

**अच्युत चिंतामण भट.**

' यशवंत ' छापखाना, पुणें.

---

आवृत्ति २ री.

सन १९१३.

---

**किंमत ६ आणे.**

# प्रस्तावना.

या 'बोलांचें' मूळ असें आहे; दोन वर्षांखालीं एक दिवस 'खोपवली' स्टेशनांत मुक्कामास असतां, वेळ जाईना म्हणून कागद लेखणी घेऊन 'अमुकच असें नव्हे,' पण कांहींतरी गद्य किंवा पद्य लिहावें म्हणून बसलों आणि त्या वेळीं यदृच्छेनें किंवा स्वयंभू प्रेरणेनें जें मनापुढें उभें राहिलें तें कागदावर घातलें (प्रथमचे १२ बोल). पुढें हे बोल आमचे बंधु व सन्मित्र रा. पांगारकर यांचें दृष्टीस पडले असतां त्यांस ते आवडून अधिक लिहिण्याविषयीं त्यांनीं आग्रह दाखविला. पण 'बोलविता' वेगळाच असल्यानें निश्चय सांगवेना. तथापि तेव्हांपासून त्या कामीं हेतु ठेवल्यामुळें दोन वर्षांत वेळोवेळीं स्फूर्ति होऊन बोलांची बरीच संख्या जमली. तेव्हां ते एकत्र छापून पुस्तकरूपानें काढावे अशा सूचना आल्यामुळें आजचें साहस करीत आहें.

बोलांचें स्वरूपासंबंधानें येथें स्वानुभवाच्या दोन गोष्टी सांगणें जरूर आहे; हे बोल वर लिहिल्याप्रमाणें स्वयंभू स्फूर्तीचे असल्यामुळें त्यांचे भाषेंत गणपतीचे घडीव मूर्तीप्रमाणें रेखलेपणा नसून स्वयंभू अष्टविनायकांप्रमाणें ओबड-धोबडपणा आहे. बोलयांस गोड दिसण्याकरितां या स्वयंभू मूर्तींस कोरूं गेल्यानें त्यांचें स्वयंभूपणाला धक्का बसतो. तसाच अनिष्ट प्रकार या बोलांवरून आपली कलम फिरविल्यास होईल या भीतीस्तव मी त्यांचे वाटेस गेलों नाहीं. दुसरी गोष्ट, त्यांच्या या स्वयंभूपणामुळेंच त्यांत स्वातंत्र्य विशेष आहे, एक-सूत्रीपणा फारसा नाहीं; पण येथेंहि माझा निरुपाय आहे.

विश्वरूपानें नटणाऱ्या परमात्माचे ठायीं जसा कोणतेच रूपाचा अव्हेर नाहीं, त्याचप्रमाणें या बोलांत सर्वच प्रकारचे दृष्टांत आले आहेत. यांत प्रसंगीं कांहीं शृंगारिक दृष्टांत आले आहेत. या संबंधानें माझीं ज्या विद्वानांशीं भाषणें झालीं व ज्या कांहींनीं लेखी अभिप्राय पाठविले, त्यांच्यांत तीन प्रकार दृष्टीस पडतात. कांहींचें म्हणणें शृंगार हा नवरसांतील 'आद्य' रस असून त्याला शुचि (पवित्र), उज्ज्वल (उजळ) अशा संज्ञा आहेत व परिचिताचे हातून अपरिचिताची ओळख करविणें हा राजमान्य रस्ता असल्यानें, प्राकृत जीवांना परि-

चित जो ' विषयानंद ' त्याचे द्वारेंच ' ब्रह्मानंदाची ओळख पटविणें अपरिहार्य आहे. व पंचदशीकारांनींहि विषयानंद प्रकरण दिलें आहे. दुसऱ्या पक्षाचें म्हणणें: "तत्वज्ञानात्मक वाङ्मय शृंगारापासून अगदीं अलिप्त व सोंवळें रहावें असें नाहीं. इतक्या सोंवळ्या विचारांना वाङ्मयत्वच येणें शक्य नाहीं. पण, अंगभूत विचारांनीं प्रधानभूत विचारांचा भंग होऊं देतां कामा नये." याच पक्षांतील दुसरे गृहस्थ म्हणतात "आपले बोलांतील शृङ्गारिक दृष्टांतहि "फारच मार्मिक" असतात, पण ह्यांची ' रेलचल ठीक नाहीं, ' व ते प्रच्छन्न असावे. तिसऱ्या पक्षाचें म्हणणें "शृंगाराचा मुळीं विटाळच उपयोगाचा नाहीं."

एतावता याही कामीं जनमताचें त्रैविध्य दिसून येतें व त्यामुळें माझें मन दोलाधिरूढ झालें आहे. कसें वागावें तें सुचत नाहीं. शिवाय माझी स्वतःची अडचण वेगळीच आहे. एक तर, माझें मन मला ग्वाही देतें कीं हे दृष्टांत आपण मुद्दाम हुडकून काढिलेले नाहींत; स्वयंप्रेरणेनें बाहेर पडले, ते खरे. दुसरें, ' ते समर्पक आहेत ' असें तीनही पक्ष्यांस कबूल असल्यानें, त्यांच्याशीं समतोल समर्पक असे अन्य दृष्टांत मिळाल्याशिवाय हे काढून टाकिल्यास प्रतिपाद्य विषयाची मोठीच हानी होते. अशा स्थितींत मी वाचकांस एवढीच प्रार्थना करितों कीं, त्यापैकीं कोणी कृपा करून तितकेच समर्पक पण सोंवळे दृष्टांत सुचवील तर पुढील आवृत्तींत मी यांस फांटा देईन. माझी त्यांचे ठायीं आसक्ति असण्याचें कांहींच कारण नाहीं.

सरतेशेवटीं, ज्या प्रेममूर्तीनें या जगांत आल्यावर माझी वाणी प्रथम पल्लवीत केली ती माझी जन्मदाती **माउली** व जिनें त्याच वाणीचा ओघ पुढें परमार्थाकडे वळविला ती **सद्गुरुमाउली** यांचे पायीं अनन्यभावें मस्तक ठेवून व असेच ' बोल ' त्यांनीं वेळोवेळीं या बालकाकडून बोलवावे अशी सप्रेम प्रार्थना करून, ही प्रस्तावना पुरी करतों.

वक्ता.

**" काय म्या पामरें बोलावीं उत्तरें ।**
**परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ "** —तुकाराम.

॥ श्रीनृसिंहसरस्वतीसद्गुरुभ्योनमः ॥

# खडे तात्त्विक बोल.



तरी तूं जैसा आहासि तैसिया । नमोंजी गुरुराया ॥
मज ग्रंथोद्यम फळावया । वेव्हारा होई ॥ १ ॥
आतां कृपाभांडवल सोडी । भरीं माझे मतीची पोतडी ।
करी ज्ञान ( गद्य ) जोडी योगमतें ॥ २ ॥ —ज्ञानेश्वरी.

१. परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी, या चतुर्विध वाणीचा जो चालक त्यास **नमन** असो.

२. नानाविध संकल्प-विकल्पांच्या फेऱ्यांत घालणाऱ्या '**मनाला**' नाहींसें करण्यास '**नमना**' ( न-मना ) सारखा सुलभ व निभ्रांत दुसरा उपाय नाहीं. कारण, ज्यांत **मन** तसेंच राहिलें तें **नमन** ( न-मन ) च नव्हे.

३. 'मनन'–शीलत्व हेंच मनुष्यत्व होय व **मनन** ( मन-न ) हाही **नमना**[1]प्रमाणेंच संकल्पविकल्पांचा आवर्त[2] ऊर्फ 'मन' नाहींसें करण्याचा अमोघ उपाय आहे. म्हणून मनुष्यमात्रानें 'मननशील' तसेंच 'नमनशील' हि असावें.

१ येथें 'नमन' व 'मनन' शब्दांवर कोटि आहे. २ भोंवरा.

४. पृथ्वीवरून उडालेला खडा पृथ्वीवर येऊन पडेपर्यंत ज्याप्रमाणें अंतराळांत भ्रमण करीत राहतो व पृथ्वीवर येऊन पोंचला म्हणजे विश्राम पावतो, त्याचप्रमाणें 'परमात्मकल्पनें' तून वेगळा पडलेला जीव, त्या स्वरूपांत परत जाऊन मिळेपर्यंत चौऱ्याशींचे फेरे फिरत रहाणार, हें उघड हिशोबीच बोलणें आहे.

*　　*　　*　　*

५. मुंबईत चौथ्या मजल्यापर्यंत उडणाऱ्या पाण्याचे मूळ 'तान्सा' नामक अगाध जलाशयाची व त्याचे उंचीची कल्पना गणिती लोकांस सहज करितां येते. त्याचप्रमाणें सर्व जीवांची स्वतः-पलीकडे पोंचण्याची साहजिक ओढ पाहून आपणा सर्वांहून उच्च व सर्वांस साधारण असा कोणी तरी अगाध आशय आहे, असें अनुमान अपरिहार्य नाहीं काय ?

६. प्रमाणांच्या वर्गांत 'अनुमान'प्रमाण हें 'प्रत्यक्ष'प्रमाणाचें दुय्यम असल्यानें 'प्रत्यक्ष प्रमाण' हें अनुमानापेक्षां अधिक जोरकस समजलें जातें. व 'प्रत्यक्षवादी' आपणांस 'अनुमानतृप्तांपेक्षां' अधिक पक्के किंवा खंद्ये समजतात. पण 'प्रत्यक्ष'प्रमाणाची अपेक्षा बाळगणारे हे अनुमानिकांपेक्षां दुर्बल किंवा कोत्या समजुतीचे असें म्हणणें प्राप्त आहे. भक्कम काठीचे टेंकणाशिवाय ज्याला पाऊल टाकवत नाहीं त्याच्या तंगड्या लटपटीत आहेत हें वेगळें कशाला सांगावयास पाहिजे ?

७. भुंग्यासारखा यःकश्चित कीटक परिमलावरूनच दूरस्थ कंटकीवनांतील केतकीच्या फणसाच्या गाभ्यांतील आनंदनिधान ओळखून काढितो. मग मनुष्यासारख्या बुद्धिवान् जीवाला या जगद्रूप कंटकीवनाचे पोटांत पडून असलेला सकलानंदनिधान परमात्मा ओळखतां येऊं नये काय?

*  *  *  *

८. प्राकृत किंवा पामराची दृष्टि व शास्त्रीय किंवा ज्ञात्याची दृष्टि ह्या वेगळ्या होत. पहिली केवळ चर्मदृष्टि व दुसरी दिव्यदृष्टि होय. ' जशास तसें ' हा न्याय जर खरा आहे तर ' परम दिव्य-स्वरूप ' म्हणूनच ज्याला कोणी देव म्हणतात त्याला पहाणें तर ही दिव्यदृष्टि संपादिली पाहिजे.

९. दिव्यदृष्टीलाच विवेकदृष्टि म्हणण्यास हरकत नाहीं. चर्म-दृष्टीचा मनुष्य समुद्राचें पाणी पाहून ' अः, हें खारटपाणी ' असें म्हणून निराश होतो व तोंड फिरवितो. विवेकदृष्टीच्या मनुष्याला 'खारवणी' यांत ' खार व पाणी '—असे दोन अवयव दिसल्यामुळें तो नाउमेद न होतां, समुद्राचे प्रवासांत, प्रसंग पडल्यास युक्तीनें ' खार आणि पाणी ' हीं यंत्रानें पृथक् काढून, आपली तहान भागवून घेतो. याचप्रमाणें ज्ञाते किंवा विवेकी या जगद्रूप खारवण्यांत मिसळलेला ' अमृतरूप ' परमात्मा वेगळा पाहूं शकतात. सम-

१ ' एडन ' येथें असें करितात असें ऐकतों.

थांनीं म्हटलें आहे ' जगीं ( जगतांतच ) थोरला देव (परमात्मा) आहे; परंतु, तो चोरिला ( चोरगस्ती, लपून ) से ( आहे ), तो हुडकिला पाहिजे.

१०. परम कारुणिक परमात्म्यानें विश्वरूपदर्शनसमर्थी भक्त-शिरोमणि अर्जुनाला दिलेली दिव्यदृष्टि, आम्हां जीवांस दिली नाहीं काय? उभय नेत्रांचें सांध्यात लपलेला शिवाचा तृतीय नेत्र आपणांस नाहीं काय?—निःसंशय आहे. पण आपण तो मिटून धरला आहे, दुसरें काय?

११. अर्जुनाला परमात्म्यांनीं आपला ' ऐश्वर योग ' दाखवितांना, आपले स्थूलरूपानें नटलेलें विश्वरूप वेगळें केलें नाहीं. तें आज आपल्यापुढें आहे तसेंच अर्जुनापुढें होतें. मात्र त्याकडे अवलोकन करण्यांकरितां त्याच्या दृष्टीवर वेगळा चष्मा चढविला.

*　　*　　*　　*

१२. ज्या चित्सागरापासून जीवरूपी अनंत बुडबुडे उठून त्याच्या अंगावर कांहीं काळ खेळून अंतीं त्यांतच लय पावतात, त्या सच्चिदानंदांत वृत्तीचा लय असो.

*　　*　　*　　*

१३. एका निर्जन वनांत जर सदासर्वदा हिरवेगार व नवीन नवीन अंकुरांनीं वाढणाऱ्या हरळीनें आच्छादित अशी भूमि आढळली तर त्या हरळीचे मुळाशीं अखंड पाण्याचा जिव्हाळा आहे,

हें जसें उघड आहे; तसेंच हें जगद्रूप विस्तीर्ण कानन सतत नवीन नवीन जोमानें अंकुरित होत आहे, तर याचा जीवनभूत झरा याचेच मूळांत कोठें तरी असला पाहिजे, हें **अनुमान प्रत्यक्षा-इतकेंच** सबळ नव्हे काय ?

१४. एखादे पडित जागेंत भलतासा दगड उलथावा तों त्या-खालून एकासारखीं एक अशीं बारीक बारीक विंचवाचीं पिलें तर-तर बाहेर पडूं लागलीं असतां, त्यांना विणारी इंगळी तेथेंच दडलेली असेल असें अडाणी मनुष्य देखील समजतो; मग अना-दिकालापासून या भूमीवर एकाच मनोधर्माचे व एकाच छापाचे अनेक जीव निपजताहेत; तस्मात् या सर्वांची आई एथेंच कुठें आसपास दडली असेल, हें सांगण्यास का हवें ?

१५. या मिथुनजन्य सृष्टींत कीटपिपीलिकेपासून मनुष्यापर्यंत अनंतविध प्राणी आहेत. त्यांतील प्रत्येक मिथुनांत नराचे मेळानें मादीची किंवा स्त्रीची अंगगठन किंवा ठेवण असते! ही गोष्ट कोणी संकल्पपूर्वक काम घडणाऱ्या कारागिरावांचून केवळ यदृ-च्छेनें होणें शक्य आहे, असें वाटतें काय ?

१६. वंध्या कितीही पुष्ट असली आणि आजन्म कितीही चरत राहिली तरी तिचे हृदयाला ओलावा असूं नये आणि तीच पुत्रवती कृशांगी असली तरी तिला दुग्धधारा अनावर व्हावी; ह्या

१. ‘ डेक्कन कालेजचे ’ भोंवतीं हा अनुभव घेतलेला आहे.

गोष्टी संकेताविरहित केवळ सहजींच होतात, असें म्हणणें धाडस नव्हे काय?

*   *   *   *

१७. "पाहिली, बोवा काल, प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिली, प्रो. राममूर्तींची शक्ति; तीन रेड्यांची शक्ति त्याला आहे!" ही भाषा तुम्ही निःशंक वापरितां. या भाषेचा अक्षरार्थ करूं जातां "शक्ति डोळ्यांनीं पाहिली," अशी तुमची कबूली पडते; परंतु अंमळ छेडून अर्थ पुसूं जातां "शक्ति" ह्मणजे 'शक्ति-कार्य' पाहिलें असें ह्मटल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. मग 'दगड उचलणें, सांखळदंड तोडणें' इत्यादि शक्तिकार्यें पाहिलीं असतां 'शक्ति पाहिली' असा अभेदानें प्रयोग करण्यास जर अवघड वाटत नाहीं, तर अनंतब्रह्मांडासारखें अचाट शक्तिकार्य पहात असूनही तत्कारक 'शक्ति' स्वीकारण्यास, अवघड कां वाटावें?

१८. प्रो. राममूर्तींची ही शक्ति आज प्रेक्षकांचे अंगीं जरी नाहीं तरी प्रत्यक्ष प्रो. स्वमुखें असें सांगतात कीं अमुक तऱ्हेनें व्यायाम व खुराक घेतल्यास तुम्हांसही ही प्राप्य आहे; व या सांगण्यावर प्रेक्षकांचा भरंवसा बसतो; तर समर्थ रामदास, तुकाराम, ज्ञानेश्वर, तुळसीदास प्रभृतींनीं वारंवार उच्चारलेले 'नरका नारायण' हे शब्द आपणांस प्रत्यायक व आशाजनक कां न व्हावे?

*   *   *   *

१९. न्यायशास्त्रानें 'गंधवती पृथ्वी' म्हणून पृथ्वीचें किंवा यावत् पार्थिवपदार्थांचें लक्षण बांधलें, हें शास्त्रदृष्टीचे मनुष्याला पटतें; परंतु, तेंच जर प्राकृतांना पटविणें तर चंदन, गोपीचंदन, वाळा, अगरू, केशर, कस्तुरी, इत्यादि पार्थिव पदार्थ दाखवावे तेव्हांच पटतें. त्याचप्रमाणें 'परमात्मा सर्वत्र आहे' याचा प्रत्यय समर्थ साधुसंतांचें चरित्रांत घ्यायला शिकावें व तेथून तो सार्वत्रिक करावा.

२०. 'शब्द तेथें प्रतिशब्द' हा ध्वनिशास्त्राचा नियम सामान्यांस पटावयास पाहिजे, तर त्यांनीं एखादे शिवमंदिराचे खोल गाभाऱ्यांत, गोलघुमटांत, खोऱ्यांत, किंवा सिंहगडावर, जाऊन "तूं"-स तूं कसें होत राहातें तें पहावें; पण तसें करितां न आलें तर आपले अज्ञानास्तव वरील नियम खोटा म्हणूं नये.

२१. शब्दास प्रतिशब्द याचाच सजातीय नियम, 'अघातास प्रत्यावात' असा आहे. परंतु याचा परिचय भिंतीवर मातीचा लपका किंवा शेणगोळा मारणाराला स्पष्ट व्हावयाचा नाहीं. तो स्पष्ट होणें तर निदान लांकडाचा किंवा रबरी चेंडू मारून पाहिला पाहिजे. भिंतीनें जाबास जाब कसा दिला हें ज्याप्रमाणें तो चेंडू आपणांस येऊन सांगतो, त्याचप्रमाणें "ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं" या भगवदुक्तीची सत्यता आपणांस समर्थांसारखेच गुंड येऊन सांगूं शकतात. इतर शेणगोळ्यांचें तें सामर्थ्य नव्हे.

गोष्टी संकेताविरहित केवळ सहजींच होतात, असें म्हणणें धाडस नव्हे काय?

* * * *

१७. "पाहिली, बोवा काल, प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिली, प्रो. राममूर्तींची शक्ति; तीन रेड्यांची शक्ति त्याला आहे!" ही भाषा तुम्ही निःशंक वापरितां. या भाषेचा अक्षरार्थ करूं जातां "शक्ति डोळ्यांनीं पाहिली," अशी तुमची कबूली पडते; परंतु अंमळ छेडून अर्थ पुसूं जातां "शक्ति" म्हणजे 'शक्ति-कार्य' पाहिलें असें म्हटल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. मग 'दगड उचलणें, सांखळदंड तोडणें' इत्यादि शक्तिकार्यें पाहिलीं असतां 'शक्ति पाहिली' असा अभेदानें प्रयोग करण्यास जर अवघड वाटत नाहीं, तर अनंतब्रह्मांडासारखें अचाट शक्तिकार्य पहात असूनही तत्कारक 'शक्ति' स्वीकारण्यास, अवघड कां वाटावें?

१८. प्रो. राममूर्तींची ही शक्ति आज प्रेक्षकांचे अंगीं जरी नाहीं तरी प्रत्यक्ष प्रो. स्वमुखें असें सांगतात कीं अमुक तऱ्हेनें व्यायाम व खुराक घेतल्यास तुम्हांसही ही प्राप्य आहे; व या सांगण्यावर प्रेक्षकांचा भरंवसा बसतो; तर समर्थ रामदास, तुकाराम, ज्ञानेश्वर, तुळसीदास प्रभृतींनीं वारंवार उच्चारलेले 'नरका नारायण' हे शब्द आपणांस प्रत्यायक व आशाजनक कां न व्हावे?

* * * *

१९. न्यायशास्त्रानें 'गंधवती पृथ्वी' म्हणून पृथ्वीचें किंवा यावत् पार्थिवपदार्थांचें लक्षण बांधलें, हें शास्त्रदृष्टीचे मनुष्याला पटतें; परंतु, तेंच जर प्राकृतांना पटविणें तर चंदन, गोपीचंदन, वाळा, अगरू, केशर, कस्तुरी, इत्यादि पार्थिव पदार्थ दाखवावे तेव्हांच पटतें. त्याचप्रमाणें 'परमात्मा सर्वत्र आहे' याचा प्रत्यय समर्थ साधुसंतांचें चरित्रांत ध्यायला शिकावें व तेथून तो सार्वत्रिक करावा.

२०. 'शब्द तेथें प्रतिशब्द' हा ध्वनिशास्त्राचा नियम सामान्यांस पटावयास पाहिजे, तर त्यांनीं एखादे शिवमंदिराचे खोल गाभाऱ्यांत, गोलघुमटांत, खोऱ्यांत, किंवा सिंहगडावर, जाऊन "तूं"-स तूं कसें होत राहातें तें पहावें; पण तसें करितां न आलें तर आपले अज्ञानास्तव वरील नियम खोटा म्हणूं नये.

२१. शब्दास प्रतिशब्द याचाच सजातीय नियम, 'अघातास प्रत्याघात' असा आहे. परंतु याचा परिचय भिंतीवर मातीचा लपका किंवा शेणगोळा मारणाराला स्पष्ट व्हावयाचा नाहीं. तो स्पष्ट होणें तर निदान लांकडाचा किंवा रबरी चेंडू मारून पाहिला पाहिजे. भिंतीनें जाबास जाब कसा दिला हें ज्याप्रमाणें तो चेंडू आपणांस येऊन सांगतो, त्याचप्रमाणें "ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं" या भगवदुक्तीची सत्यता आपणांस समर्थासारखेच गुंड येऊन सांगूं शकतात. इतर शेणगोळ्यांचें तें सामर्थ्य नव्हे.

२२. यत्किंचित् फळ झाडावरून खालीं पडतांना पाहून न्यूट-नला चंद्रसूर्यादि अनंत गोलांना ज्यानें अगदीं गच्च जखडून टाकिलें आहे असा एक गतिशास्त्राचा विश्वव्यापि नियम दिसला. शहाण्यांना असा "बिंदुंत सिंधू सांपडतो, परंतु दगडांना सिंधूंत बुडूनही बिंदु लाभत नाहीं," हा दोष कोणाचा?

* * * *

२३. फुलांफुलांतून बिंदु बिंदु उचलून मधुमक्षिका पोळेंभर मध सांठवते, त्याचप्रमाणें कुशल पुरुष या विचित्र जगतांतून बिंदु बिंदु करून परमात्मभावना उचलून तिचा आपले हृदयांत मोठा सांठा करितात.

२४. कोणी चतुर पुरुष उन्हाळ्यांत एका कुसरितेचे[1] पात्रांतून जात असतां तिचें अल्प व नासकें जळ पाहून प्रथम निराश झाला. परंतु त्यास लवकरच त्याच पात्रांत कांहीं अंतरावर लहानसा एक झरा खणलेला दिसला. त्यांत पहातो तों स्वच्छ व सुंदर जळ आढळलें. तें पाहून त्यानें तर्क केला कीं वाळूंत पाणी स्वच्छ राहतें; व घरीं येऊन त्यानें 'फिल्टर' तयार केलें, त्याचप्रमाणें कल्पक पुरुष या संसाररूप कुनदीचे पात्रांत फिरत असतां त्यांतील 'स्वच्छ जीवनाची' कल्पना उचलून घेऊन ती आपलीशी करून सोडतात!

१ अल्प नदी.

२५. जळती गोंवरी, पेटलेली मशाल, जलाल निखारा, लाल लोखंड, धुराचा दिवा, विजेची बत्ति, इत्यादि अनेक रूपांनीं--परंतु उपाधिगतच—अग्नि तुझ्या दृष्टि पडत असूनही अग्नीची केवळ 'दाहात्मक' अशी उपाधिरहित लक्षणा जर तूं सुखानें करूं शकतोस, तर त्याच दृष्टीनें या स्थावरजंगमरूपानें अखंड हलणाऱ्या-चालणाऱ्या, हंसणाऱ्या-खेळणाऱ्या या विविध सृष्टिरूप उपाधींतून केवळ **सच्चिदानंदलक्षण** अशा परमात्म्याची भावना करणें अवघड कां व्हावें ?

*  *  *  *

२६. ज्याप्रमाणें वर हा ताशेवाजंत्र्यांचे गजरांत व जनसंमर्दांत आचार्यांचे साहाय्यानें वधूचे करग्रहण करितो. परंतु तिचा यौवनास्वाद घेणें तर तिला घेऊन एकांतीं जातो. त्याप्रमाणें जगताचे धांगडधिंग्यांत घुसूनच परमात्मभावनेचा हात पकडावा, मात्र तिचा रसास्वाद घेणें तर एकांत शोधावा. (रमाकांत एकांत काळीं भजावा).

*  *  *  *

२७. पर्वतीच्या पायथ्यापासून कालवा वहात चालला आहे. गंमत अशी आहे कीं, कालव्याच्या **वरच्या किंवा चढत्या** बाजूला ज्या जमिनी आहेत तिकडे पाणी फोडून घेतलें तरी जात नाहीं; परंतु कालव्याच्या **उतरत्या किंवा नमत्या** बाजूला ज्या जमिनी आहेत त्यांकडे आपोआप ओलावा पोंचतो. हाच न्याय कृपौघाचा आहे.

जे मी मी म्हणून चढेलपणानें वागतात त्यांनीं कष्ट करूनही ते ओघ तिकडे वळत नाहीं. परंतु जे बिचारे निरहंकृतीनें त्यांशीं अत्यंत नम्रतेनें वागतात त्यांकडे, नको म्हटलें तरी, तो कृपौघ लोटण्यास रहात नाहीं. भगवंतांनीं म्हटलें आहे, " आंवरिता नाटोपे निम्नाप्रति अद्रिचा जसा ओढा." त्याचा अर्थ हाच.

२८. तुकाराम म्हणतात ' जरी व्हावा तुज देव, तरी हा सुलभ उपाव। करी मस्तक ठेंगणा, लागें संताच्या चरणां ॥' याचाही अर्थ वरीलप्रमाणेंच. हा उमग आणि तसा वाग म्हणजे कृतार्थ होशील.

* * * *

२९. खेडेगांवांत अजूनही क्वचित् कोणी चकमकीवर विडी पेटवितात. अशांपाशीं ' कप ' ( रुई ) नांवाचा एक कापसासारखा मृदु व ग्राहक असा पदार्थ असतो. तो उडालेली ठिणगी कायम धरून ठेवितो. हा नसेल तर ठिणग्या फुकट विझून जातात. याच-प्रमाणें पुष्कळदां विपत्तींच्या चकमकींतून परमात्मभावनेच्या ठिण-ग्या सहजीं आपलेकडे येतात; पण त्या कायम धरून ठेवण्यास त्या कपाप्रमाणें मृदु व ग्राहक मन नसल्यानें विझून फुकट जातात. कारितां मनाची कमावणी ही पहिली गोष्ट आहे.

३०. कोणी कारकून खर्डा लिहितो व नंतर वर गुलाल टाकितो. त्या खर्ड्यांत जितके ठिकाणीं शाई ओली असते तितके ठिकाणीं गुलालाचे कण चिकटतात; इतर ठिकाणचे पडून जातात. त्याच-

प्रमाणें परमात्मभावनेचे कण जेथें साधकाचे हृदयांत भक्तीचा ओलावा असेल तेथेंच चिकटून राहतात; इतरत्र गळून जातात. सबब भक्तीनें आर्द्र असें हृदय ही महत्त्वाची सामग्री आहे.

*　　*　　*　　*

३१. कोंडल्या पाण्यांत काष्ठपर्णादि स्थिर राहतें. तेंच वाहत्या पाण्यांत भलतेचकडे जाऊन पोंचतें. त्याचप्रमाणें ज्यांनीं शमदमांनीं मन कोंडलें आहे अशांचे ठायीं उपदेश ठरतो, परंतु ज्यांचें मन दशेंद्रियद्वारा अहर्निश विषयाभिमुख वाहतें अशांचे ठायीं तो भलतेचकडे वाहवतो..

३२. स्थिर जलांत जेथें एकच चंद्र (बिंब) दिसतो, तेथें चंचल जलांत दर तरंगास एक एक चंद्र दिसतो. अशाच प्रकारें, स्थिर चित्तास जें जगत् एकरूप भासतें तेंच चंचल चित्तास बहुरूपी भासून भूल घालितें.

३३. कार्तिकमासीं तुळशीबागेंत श्री शेषशायीपाशीं पाण्यांत फुलांच्या पांकळ्या सोडून अतिरमणीय गालिच्या भरतात. पाण्यासारख्या पदार्थांवर गालिच्या भरणें खचितच कठिण, परंतु हीं गोष्ट पाणी कोंडून शांत व सुस्थिर केल्यानें साध्य होते. हें जर पाणी वाहतें राहील, तर सहस्रवर्षें पांकळ्या टाकीत बसलें तरी कांहीं उठाव होणार नाहीं. हाच न्याय मनाचा.

३४. चांचल्य व स्थैर्य ह्या उभय मनाच्याच अवस्था. पण त्यांच्या फलांत केवढें अंतर! धांदली धांदलीनें बाहेरून घरांत शिरावें, व अशा वेळीं जर पुढें एकादी दोरी, पाण्याचा ओघळ वगैरे असेल तर तत्काळ सर्पभास होऊन मनुष्य घाबरून सकंप, किंबहुना, मूर्च्छागत होतो. हाच जर स्थिर चित्तानें व स्थिर दृष्टीनें आंत येता तर असा प्रसंग न होता. खरें पाहतां, सर्प हा भ्रम दूर होऊन रज्जूचें सत्यभान होण्याला **स्थिरचित्ता**पलीकडे कांहीं साधन नको.

३५. मातट पाणी हालवावें तों अधिकच गढूळ होऊन त्यांत कांहींच दिसेनासें होतें, परंतु तेंच कांहीं काळ स्थिर किंवा शांत राहूं दिलें असतां सर्व माती खालीं बसून तें निवळतें व नंतर त्यांत प्रत्येक बाह्यवस्तूचें प्रतिबिंब दिसतें, इतकेंच नव्हे, तर खुद्द त्याचे तळाशीं काय आहे तेंही दिसतें. हाच न्याय मनाचा समजावा.

३६. विहिरीचे बुडाशीं काय आहे हें दिसण्यास जसें पाणी अत्यंत स्वच्छ व निर्मळ असलें पाहिजे, त्याचप्रमाणें मनाचे बुडाशीं किंवा पलीकडे काय आहे, हें बघणें असलें तर मन स्वच्छ निर्मळ व निस्तरंग झालेंच पाहिजे, हें हिशोबीच आलें.

*　　*　　*　　*

३७. एके ठिकाणीं अर्धकोशपर्यंत सारखा खडकाळ भाग आहे; व त्यावर एक इंच पाऊस पडला; व या एकूण क्षेत्रावर

मिळून जेवढें पाणी पडलें, तेवढेंच पाणी त्या खडकाचे मध्यभागीं एक खोल टांकें आहे त्यांत पडलें. नंतर दोन प्रहर कडक ऊन पडलें, तर खडकावरील सर्व पाणी तेव्हांच शोषून कोरड पडेल; परंतु एकत्र सांचलेलें पाणी असें उडून न जातां कायम राहून किती तरी इष्टकार्य साधील. याच न्यायानें इंद्रियाचे नादानें विषयांवर जी मनाची थेंब थेंब शक्ति खर्ची पडते तीच जर एकवटून एकाच अंतर्गत गोष्टीवर लावली तर केवढी तरी कायमची कामगिरी होईल, हें उघड आहे. थेंबें थेंबें तळें साचें तेंच हें.

३८. परंतु, माकड ज्याप्रमाणें रिकामें कधींच बसत नाहीं; पण सात पिढ्या लोटल्या तरी रोज खेत करीत असूनही, स्थिर व ऐकांतिक प्रयत्नाचे अभावामुळें स्वतःसाठीं एक घरटा बांधूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें हें मन क्षणभर या विषयामागें, क्षणभर त्या विषयामागें असें सहस्र जन्म माकडचेष्टा करण्यांत उद्युक्त राहतें व यामुळें त्याला आपणासाठीं कायम विश्रांतीचें घर ( तद्धाम परमं मम ) हें बांधतां येत नाहीं, हें उघडच आहे.

३९. पण हा हिशेब जर आम्हांला समजेना तर आम्ही गणीत व्यर्थ शिकलों नव्हे काय? "तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः" ( भगवद्गीता अ. ६ श्लोक १२ ) या श्लोकानें मन "एकाग्र" करूं सांगणारा गृहस्थ अट्टल गणिती होता; पण हें तरी आम्हांला कुठें कळतें आहे?

४०. कांचेचे साह्यानें सूर्याचे किंवा चंद्राचे प्रसृत किरण एकत्र केले असतां गोवरी, कापूस वगैरेस अनुक्रमें पेटवितात किंवा भिजवितात. परंतु ज्यांनीं त्यांचें असें एकीकरण किंवा केंद्रीकरण करून पाहिलें नाहीं त्यांना किरणांचें हें सामर्थ्य कळत नाहीं ! याच प्रकारें एकीकरणानें व स्थिरीकरणानें अनुभवास येणारे मनाचे सामर्थ्याची स्थिति आहे, हें जर आह्मांस कळत नसेल तर हा दोष कोणाकडे ?

४१. ज्या कित्येक गोष्टी वरपांगीं बघणाऱ्या असाध्य किंवा असंभव भासतात, त्याच विवेकी, गणिती, हिशोबी दृष्टीला शक्य वाटतात. Nature abhors vacuum, ' ह्या सृष्टीला रिक्त स्थल आवडत नाहीं ! ' असा वरपांगीं बघणारांनीं कित्येक शतकें सिद्धांत ठोकून टाकिला होता; परंतु कांहीं यंत्रसाह्यानें एखादी खोली किंवा अन्य स्थळ रितें ( निर्वात ) करितां येईल असें एका हिशोबी माणसाला वाटलें, व त्यानें आपलें वाटणें अनुभवानें सिद्ध करून दाखविलें. सबब कोणत्याही गहन गोष्टींत असल्या हिशोबी लोकांच्या अकलेनेंच चाललें पाहिजे.

४२. याचप्रमाणें वरपांगीं पहाणारांचे दृष्टीनें ' मन ' हें अत्यंत नादान, चंचळ व अनावर असें दिसत असल्यानें, त्याचें स्थिरीकरण ही केवळ अशक्यच गोष्ट आहे असें लोक मानितात. इतरांचें राहो. पण प्रत्यक्ष अर्जुनानें देखील ' मन हें मस्त, दांडगें,

विजेहून चपळ अतएव दुर्निग्राह्य आहे ' अशी त्याचे नांवानें निराशेचे भरांत ओरड केली. पण त्याचा गुरु होता हिशोबी डोक्याचा. त्यानें त्या ओरडीला जुमानलें नाहीं.

४३. फाल्गुनानें मनाच्या दुर्निग्रहत्वाचा बागूल भासून बोंब ठोकावी हें ठीकच आहे. कारण तो **अपंडित** होता; म्हटलेंच आहे कीं " भयस्थानशतानिच, दिवसे दिवसे मूढ माविशति न पंडितं " परंतु श्रीकृष्ण हा **पूर्णपंडित** ऊर्फ **मर्मज्ञ** होता. त्यामुळें त्याला बागुलबोवाचें भय वाटलें नाहीं; म्हटलेंच आहे कीं ' तरति शोकमात्मवित्. '

४४. पंडित किंवा मर्मज्ञाची गोष्ट निराळी आणि अपंडित किंवा मूढाची वेगळी. पहिला देखाव्यानें फसत नाहीं म्हणून भीतही नाहीं. एकादे वेळीं पैलवानांची अशी कुस्ती दृष्टीस पडते कीं, त्या जोडीपैकीं एक दिसण्यांत मोठा धिप्पाड व अगडबंब असतो व त्याला पाहतांच सामान्य प्रेक्षकांस धडकीच भरते. परंतु त्याचा प्रतिद्वंद्वी लुकडा व फाटक्या अंगाचा असला तरी खरा **मर्मज्ञ** असला तर त्या धडेलाला भीत नाहीं. कारण तो समजतो कीं, नुसत्या देखाव्यांत काय आहे, एक मर्मी पेंच घालीन व हें त्रिकूटाचें शिखर तेव्हांच कोसळीन. आणि असे मासले आपण पाहतोंही.

४५. त्या धडेल दहातोंड्यालाही जें उताणें पाडायला राहिलें

नाहीं, असलें शिवधनुष्य पुढें पाहून बिचारी **अपंडित** जानकी भयविव्हल झाली. परंतु दशरथाचा छावा कसा तो कचरला नाहीं. त्यानें तत्काल प्रत्यंचा चढविली. कारण तो **मर्मज्ञ** होता.

४६. म्हण आहे " नास्ति मृत्योः परंभयं " म्हणजे मृत्यूपरतें भय नाही. पण पितामह भीष्म हे मृत्यूला भ्याले नाहींत; कारण तें मृत्यूचें मर्म जाणत होते. मार्कंडेयही डगला नाहीं; कारण तोही मृत्यूचें मर्म ऊर्फ यमाचेंही मरण ( मर्म हा शब्द " मृ=मरणें " यापासूनच सिद्ध झाला आहे. ) म्हणजे ' शिवचरण ' हें जाणत होता. सारांश मर्मज्ञाला भय नाहीं. **मर्म** ओळखणें हेंच **पांडित्य**.

४७. गहूं जड, पण कांकडी किंवा उडीद हें त्याचें मर्म आहे. आंबरस बाधक; पण, कोमट दुधापुढें गप्प. विंचू द्वाड, पण पालीपुढें स्तब्ध. सर्प क्रूर पण नकुलापुढें भेडुळतो. सारांश, कशा-चेंही ' मर्म ' सांपडलें कीं भय उडालें.

४८. त्या चतुर विश्वकारागिरानें मर्मावांचून एकही पदार्थ घडला नाहीं. आपले शरीरांत १०७ मर्मे आहेत. व्याघ्र एवढा विक्राळ बळकट पशू, परंतु पोटऱ्याला अगदीं पिचका. कस-लेला वाघमाऱ्या तिथेंच लाठी खुपसतो.

४९. त्याचप्रमाणें मन हें फार जोरदार, ओढाळ व अनावर-- हा बाऊ अर्जुनाला होता. परंतु कृष्णपरमात्मा मर्मज्ञ असल्यानें त्यांना कां असावा ?

५०. श्रीकृष्णांनीं सांगितलें कीं, 'तुला या मनाचा बाऊ वाटतो हें ठीकच आहे; परंतु याला उताणें घाल, आणि चिकाटी सोडूं नको, (वैराग्य आणि अभ्यास कर) म्हणजे हें मेलें!

५१. परमात्म्याचें हें बोलणें हिशेबीच खरें. जळांत असतां गजेंद्रासारख्याचा पाय खेंचणारा नक्र अत्यंत दुष्ट व बलाढ्य प्राणी, परंतु तोच वाळवंटावर उताणा टाकिला कीं, निर्बळ व दीन होतो.

५२. घोरपड अ० अनेक सरपटणारे प्राणी भुईकडे तोंड करून चालत आहेत तों इतका जोर करितात कीं, आपणास आकळत नाहींत; परंतु तेच युक्तीनें भुईकडे पाठ केली असतां हीनबळ होतात. मनाचाही वात्रटपणा असाच. तें जों विषयाभिमुख धांवतें आहे तों असा जोर बांधतें कीं, बेसुमार. परंतु कोणी युक्तीनें विषयाकडे पाठ करविली असतां ऊर्फ उताणें पाडलें असतां दीन होऊन आपलें ताबेदार होतें.

५३. घोरपडीचा दृष्टांत सुंदर आहे. परंतु तो मनाला लावावा कसा? मनाला पाठ ना पोट, पाय ना तोंड. भाकरीला जसें तोंड नाहीं किंवा पाण्याला जसें सर्वत्रच तोंड आहे तशांतलें हें मन नितोंड्यें किंवा विश्वतोंड्यें आहे याला काय करावें?

५४. होय, पाणी बारा वाटे धांवतें, तें विश्वतोंड्यें आहे, व अमरकोशांत त्याला "सर्वतोमुखं" (पुष्करं सर्वतोमुखं)—असेंही म्हटलें आहे. पण त्याला एकतोंड्यें बनवितां येतें. नळाचें पाणी

एकच तोंडानें येऊं शकतें किंवा मोठ्या जलाशयालाही एक पाट फोडून दिला असतां सर्व पाणी त्याच दिशेला ओढ घेतें किंवा त्या पाटानेंच वाहतें.

५५. हाच हिशेब मनाला लागण्यासारखा आहे. तें पाण्यासारखें स्वभावतः 'सर्वतोमुखं' खरें आहे; तथापि युक्तीनें किंवा कृतीनें तें 'एक–तो–मुख' बनवितां येतें. पण हें पंडित जाणतात. श्रीकृष्ण हें जाणत होते. म्हणून तत्रैकाग्रं मनः कृत्वा हा उपदेश त्यांनीं केला.

५६. पंडितांनीं तरी हें मर्म जाणिलें कोठून? विषयलंपटांचे चाळे पाहूनच. "कामातुराणां न भयं न लज्जा" हा श्लोक बांधणाऱ्या पण्डिताला हे त्याचे चाळे उमगले. 'क्षुधातुराणां न रुचिर्नपक्वं" हें म्हणणारालाही उमगले. "चिंतातुराणां न सुखं न निद्रा" हें सांगणाराही मर्मज्ञच.

५७. फकीर मुलूखभर हिंडला तरी मशीदींत ठरतो; उनाड गुरूं रानभर भटकलें तरी रात्रौ गोठणीवर बसतें. भुंगा कितीही दूर गुंगत गेला तरी कमळांत अडकतो. वाघ कोठेंही लपला तरी पाणी पिण्याकरितां जलाशयावर येतोच. शहाणे हें मर्म ओळखून या प्राण्यांना त्या स्थळींच पकडतात, हीच युक्ती मनाचे कामीं उपयोगी कां न पडावी?

५८. अर्जुन ओरडतो कीं, मन एकाग्र होत नाहीं. व तें आप-

णांस खरेंही वाटतें (याचें कारण आपणहीं त्याच वर्गांतले!).
परंतु आजारी लेंकराची आई अर्जुनाचे उलट साक्ष देते; पतिव्रता
विरहिणीही उलट साक्ष पटविते; वनांत जाणारी धेनूही प्रतिपक्षच
करिते, (**तिचें चित्त बाळापाशीं**) याची वाट काय?

५९. कदाचित् माता, विरहिणी व धेनु, या भोळ्या स्त्रीजाती
म्हणून असली साक्ष देत असतील असें म्हणावें; तर चहाटळ
जारिणीही तीच साक्ष पुरविते. पण, जारिणी तरी स्त्रीजाती, तिचे
साक्षीला इतकी किंमत देतां येत नाहीं. परंतु योगीही तीच साक्ष
देतो. मग अर्जुन खरा कीं योगी खरा?

६०. योगी साक्ष देत असेल, परंतु ती प्राकृतांना समजणें
शक्य नाहीं. मग तिचा काय फायदा? असें म्हणावें, तर साव-
जावर बाण टाकणारा व्याधही हेंच सांगतो. बरें सुळावर चढवि-
ण्याकरितां उभा केलेला अपराधीही याच गोष्टीला पुष्टि देतो.

६१. हे साक्षीदार लबाड नव्हत, तरी पण यांची साक्ष अनु-
मेयच ठरते. सबब खात्रीबंद म्हणवत नाहीं—याहून कोणी सांप-
डतो काय? ओ हो! तो पहा; विंचवानें फणकारलेला मनुष्य. तो
काय सांगतो? पुसा तर खरं!

६२. तो म्हणतो, 'माझें सर्व मन या सर्व साडेतीन हात
विस्तारलेल्या देहांतून ओघळून येऊन या दंशबिंदूंत गोळा झालें
आहे.' ही साक्ष खोटी म्हणवत नाहीं. तथापि विपद्ग्रस्त हे

भ्रांतचित्त असण्याचा संभव आहे. त्या अर्थी एखाद्या सुस्थाची साक्ष असल्यास बरें.

६३. ही सुस्थाची साक्ष कोण देणार ? बरें, हा कानांत अत्त-राचा बोळा घालून चाललेला गुलजार तरुणीपति, हा कांताधर-मधुमिलिंद काय बोलतो ?–रतिकाली, अधरपानकाली, **अनन्यमनस्कतेचीच** हाही साक्ष देतो.

६४. बरें, चोचकयावर टपलेला भामटया, आकाशांत घेरे घेणारी घार, नदीतीरीं एका पायावर तपस्या करीत बसलेला बगळा व अंधारांत उंदिरमामांचे पाळतीवर बसलेल्या मनामा-वशीही **चित्तैकाग्र्याचीच** साक्ष देतात.

६५. जननी, विरहिणी, जारिणी, व्याध, वध्य, योगी, भोगी, धेनु व वृश्चिकदंष्ट्र, भामटया, घार, बगळा, भाटी इतक्यांच्या साक्षी जर एक पटतात, तर अर्जुनाचे तक्रारीवरून निराश न होतां, श्रीभगवंताचे ' गृह्यते ' (मन आकळलें जाऊं शकतें, ) या उक्तीवर विश्वास ठेवणें हेंच अधिक समंजस ठरत नाहीं काय ?

६६. वाळूंत पाणी पाहून जर घरीं फिल्टर करण्याची आम्ही उमेद धरतों, तर वरील अनेक साक्षीदारांचे प्रत्ययावरून आप-णांसही मन एकाग्र करितां येईल अशी उमेद कां नसावी ?

६७. आतां, शेजारी श्रीमंत झाला म्हणून आपणही श्रीमंत होऊं. अशी उमेद धरणें. हें प्रसंगीं जरी समंजस दिसलें तरी

सर्वथा कार्यसाधक होईलच असें म्हणवत नाहीं. कारण कितीं झालें तरी हें ' परतःप्रामाण्य झालें. ' स्वतःप्रामाण्य ' असेल तर अधिक इष्ट होय, म्हणून तें आपण पाहूं.

६८. हें कोठें शोधावें ! भगवंताचे उक्तींतच शोधावें. भगवंत म्हणतात ' वैराग्येणच गृह्यते ' ( वैराग्यानें आकळलें जातें ) वैराग्य या शब्दांत मन एकाग्र होण्याविषयीं ' स्वतः प्रामाण्य ' आहे; कसें तें पहा

६९. ' वैराग्य ' हा शब्द ' वि–राग ' या शब्दावरून साधला आहे. आणि ' राग ' हा शब्द ' रञ्ज् ' धातूपासून साधला आहे. अर्थात् ' राग ' शब्दाचा अर्थ ' रंग ' असा आहे. न ' वि ' उपसर्गाचा अर्थ ' वियोग किंवा अभाव ' असा आहे. म्हणजे ' रंगाचा अभाव ' होणें हें वैराग्य होय.

७०. ( ' वैराग्याचा ' हा अर्थ ठीक असला तरी ' मन हें विरक्त किंवा वैराग्ययुक्त किंवा ' रंगरहित ' होईल याला प्रत्यय काय ? )

७१. जो जो पुरुष माडी चढेल तो तो ' प्राणप्रियच ' म्हणून मुखानें म्हणणाऱ्या ' वारांगनेला ' खरें बोलूं जातां, कोणीच ' प्राणप्रिय ' नाहीं हें उघड नव्हे काय ? ज्या पात्रांत टाकावें त्या पात्राचा आकार जर पाणी घेतें तर त्याला स्वतःचा आकार कांहींच नाहीं, असेंच नव्हे काय ? याच हिशोबानें, पुढें येईल

त्या त्या वस्तूचा रंग जर मन घेतें आहे, तर स्वतः त्याला कोणताच विशिष्ट ' रंग ' नाहीं हें म्हणणें चुकीचें आहे काय ?

७२. ' रंग' नाहीं, असें म्हणावेंसें वाटतें. परंतु म्हणवत नाहीं. कारण पहावें तों मन सदा नी कदा कोणत्या ना कोणत्या तरी विषयांतरीं रंगलेलेंच असतें, मग उलट कल्पना करण्याचें धाडस कसें करावें ? तर बाबा, ' अळिता ' हा सदा रंगितच दृष्टीस पडतो. परंतु ज्यावर अळित्याचा रंग चढविला आहे तो मूळचा कापूस लाल नसून शुभ्र आहे हें जो जाणतो, त्याला ज्याप्रमाणें चढविलेला रंग कांहीं रासायनिक संयोगानें उतरून घेऊन कापसाचें मूळ शुभ्रस्वरूप सिद्ध करणें शक्य वाटतें, त्याचप्रमाणें अपंडित विषयी जनांचीं मनें जरी सदैव विषयांत रंगलेलींच दिसलीं तरी तीं स्वयमेव रंगीतच आहेत असें पंडित किंवा मर्मज्ञ मानीत नाहींत.

७३. म्हटलें आहे ' नासतो विद्यते भावः ' याप्रमाणें ' नसत्याचें असतें ' कोणी करूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें ' असत्याचें नसतेंही ' कोणी करूं शकत नाहीं. ( नाभावो विद्यते सतः ) सर्व अक्कल म्हणजे बिघाडाची दुरुस्ती करणें, या पलीकडे नाहीं. तांबडेपणाचा तांबडेपणा कोणीच नाहींसा करूं शकत नाहीं; कारण तो स्वसिद्ध किंवा सत् पडला. परंतु, अळित्यासारख्या पदार्थांचा तांबडेपणा उतरतां येतो; कारण तो कृत्रिम किंवा असत् होय. याच-

प्रमाणें, मन हें जातीचें रंगित नाहीं. अतएव तें निरंग किंवा शुभ्र करितां येईल, हें म्हणणें हिशोबीच नव्हे काय?

७४. हिशोबी नसतें तर, पहिल्यावेळीं मोतीया, दुसऱ्या खेपेस गुलाब, तर तिसरे वेळीं गुलेअनार असे रंग देण्याची गुलजारांची हौस न पुरती! हे तिन्ही रंग मूळ रंग नव्हत. मूळ वस्त्राचा रंग शुभ्रच आहे. या आगंतुक रंगांनीं तो कियत्काल लुप्त किंवा अंतर्हित केला असतो. याचप्रमाणें मनाचें शुद्धस्वरूप आगंतुक विषयांचे संगानें अंतर्हित झालें आहे, परंतु मेहनतीनें किंवा यत्नानें तें पुनः शुद्ध करितां येईल, हें मर्मज्ञ भगवान् जाणून चुकले; या हिशोबानेंच त्यांनीं 'वैराग्येण' हें पद घातलें. नव्हे काय?

७५. "हा एवढा पांढरा धवधवीत कपडा परिटाकडे देऊन याचा एवढा पांढरेपणा काढून टाकवा—" असा प्रयोग कोणीही कधीं करीत नाहीं; परंतु तोच तांबडा, हिरवा, पिंवळा इ. इ. रंगांनीं युक्त असल्यास ह्यांसंबंधीं असा प्रयोग ऐकूं येतो. यावरूनच कळतें कीं, हे सर्व रंग आगंतुक अतएव याप्य आहेत. शिवाय, पांढऱ्या शुभ्र कापडाला "रंगित" शब्द कोणीही लावीत नाहीं, यावरूनच "रंगित" हें कपड्याचें मूळरूप नव्हे; हें तसेंच स्पष्ट आहे. ह्याचप्रमाणें मन विरागयुक्त ह्मणजे रंगरहित करावें असा प्रयोग श्रीभगवान् ज्या अर्थीं करतात त्या अर्थीं 'रंगित' हें मनाचें खरें स्वरूप नव्हे हें स्पष्टच झालें.

७६. सांगतात कीं पेशवाईत एक बहुभाष आला होता. मराठी, गुजराथी, कानडी, हिंदुस्तानी इ० सर्व भाषा तो समान सौलभ्यानें व पूर्ण शुद्ध रीतीनें बोले. त्यामुळें त्याची मातृभाषा कोणती हें गूढ पडलें. परंतु एका चतुराचे सुचनेवरून तो बहुभाष्या गाढ निद्रेंतअसतां त्याला डिंवचलें, त्या सरशीं तो 'शूं शूं' करीत उठला व त्यावरून ह्याची मूळभाषा गुजराथी असावी असा ज्ञात्यांनीं सिद्धांत केला. याचप्रमाणें व्यवहारांत मन जरी पुढें येईल त्या त्या पदार्थांचें रूप धारण करीत असलें तरी त्याचें मूळ स्वरूप म्हणून कांहीं विशिष्ट असलें पाहिजे; मात्र तें युक्तिवान् असेल तोच हुडकून काढील.

७७. जागृतींत व्यवहारकालीं जरी तो बहुभाष्या अनेक भाषा बोले, तरी सुषुप्तींत ह्मणजे जेव्हां सर्व व्यवहार लीन असतो अशा वेळीं त्याचे ठिकाणीं जें मूळ भाषेचें रूप होतें तेंच स्फुरलें, त्याचप्रमाणें जागृति टाकून मन ज्यावेळीं सुषुप्तींत शिरूं पहातें अशा वेळीं मनाचें जें रूप असतें तेंच त्याचें खरें स्वरूप होय. योगवासिष्ठांत म्हटलें आहे:—

"निद्रादौ जागरस्यांते यो भाव उपजायते।
तं भावं भावयन्साक्षादक्षय्यानंदमश्नुते ॥"

ही स्थिति म्हणजे निर्विकार स्थिति होय.

७८. Serpentine curl किंवा 'नागमोड' हे शब्द सुप्रसि-

द्रच आहेत, व यावरून सर्पाची गति 'कुटिल' असते असा सार्वत्रिक समज आहे, हें उघड आहे. परंतु अवलोकनशील पुरुष असें सांगतात कीं, सर्प जरी बाहेर फिरतांना कुटिलगतीनें फिरतो, तरी तो स्वतःचे घरांत म्हणजे बिळांत शिरतांना कुटिलपणा टाकून सरळ होतो. याचप्रमाणें मन जरी व्यवहारकालीं उच्चावच विषयानुषंगानें कसेंही वेडेवांकडे आकार धरीत असलें, तरी तें सुषुप्तींत जेव्हां आपले विश्रांतिस्थानीं शिरतें तेव्हां त्याचे ठिकाणीं हा कुटिलपणा मुळींच उरत नाहीं.

७९. पहा बरें, निद्रिस्ताचे शेजारीं त्याचा वैरी येऊन पडला तरी त्याचे ठिकाणीं वैरभाव मुळींही नसतो. परंतु जागृतींत येऊन "हा माझा वैरी आहे" अशी भावना मनानें वरिली म्हणजे शत्रुमित्रभाव जागा होतो. अर्थात् हे सर्व भाव मनानें उसने घेतलेले आहेत; त्याचे स्वभावसिद्ध नव्हत.

८०. व्यवहारांत देखील मन सर्वदा कुटिलच असतें असें नाहीं, पहा बरें तरुणीचें उन्नत भुजांतर पाहून तें जसें विकृत होतें, तसें एकाद्या दुलदुलित तरुणाच्या छातीचा उठाव पाहून होत नाहीं.

८१. बरें, असें कां? एकपरी पाहतां, त्याला दोहींकडे मांसपिंडाचीच मेजवानी. असें असतां दुसरीची तें उपेक्षा करितें व पहिलीवर तुटून पडतें ! ह्या भेदांतलें इंगित कोठें आहे?–भावनेंत!

८२. भावनेंतच; विषयस्वरूपांत नव्हे. कारण, नाटकगृहांतील

स्त्रीवेषधारी नटाचे देहावर चिंध्यांच्या चेंडूला जो दर आहे, त्याच्या शतांश देखील बिचाऱ्या दुलदुलिताच्या जातिवंत अवयवांना नाहीं! हें भावनेचेंच सामर्थ्य नव्हे काय?

८३. माया, नजरबंदी, देखतभूल, ती हीच. हिचे पार जाणें म्हणजे **भावनेची मालकी** हातीं आली पाहिजे, तरच साधेल.

८४. भर्तृहरीनीं म्हटलें आहे:—( यदाभूदज्ञानं स्मरतिमिरसंस्कारजनितं । तदादृष्टं नारीमयमिदमशेषं जगदपि । इदानीमस्माकं पटुतरविवेकांजनजुषां । समीभूता दृष्टिस्त्रिभुवनमपि ब्रह्म मनुते ) म्ह० पूर्वी जेव्हां कामांध होतों तेव्हां हें सर्वच जग **नारीमय** दिसत होतें, परंतु आतां विवेकानें दृष्टि उजळल्यानें तेंच **नारायणमय** दिसतें आहे. वास्तविक पाहतां जग पूर्वी तेंच आतां आहे. मात्र द्रष्ट्याची भावना बदलली आहे.

८५. आपले मामाची जी मुलगी ती आपली मामेबहीण होते; व याला अनुसरून आपल्या मामास मुलगी झाली म्हणजे तिचे ठिकाणीं सहजींच बहिणीची **भावना** असते. आतां देशस्थांत भावाची मुलगी बहिणीचे मुलास चालते, व हा कायदा ज्या भावंडांत अमलांत येईल तेथें आपडी थापडीचा डाव सुटून दर्शनाबरोबर लाजून बिचारे बहिणीला मान मुरडण्याची वेळ येते. हा तरी **भावनेचाच** फरक नव्हे काय?

८६. एकच स्त्री योगी, भोगी व हिंस्र पशु यांना अनुक्रमें नरकाची हुंडी, मदनाची मंजरी व मांसाची पुतळी भासणें, हा तरी भावनेचाच फरक नव्हे काय?

८७. सतारींत सगळेच बोल भरलेले आहेत, वादक ज्या हिशोबानें बोलवील त्या हिशोबानें ते कोमल, तीव्र, कुंद किंवा खुलास उठतील. त्याचप्रमाणें आपल्यांत सर्वच प्रकारच्या भावना भरल्या आहेत; पण आपण ज्या हिशोबानें बोलवूं त्या हिशोबानें त्या उठतील!

८८. मनाचें चांचल्य व नैकरूपत्व पाहून नवशिक्या साधकाला कधीं कधीं त्रास येऊन वाटतें कीं, हें मन घडविणारा खचित अपण्डित असला पाहिजे; हाच जर मन एकरूपी ठेवता तर किती मौज झाली असती. परंतु खोल विचार करील त्याचे ध्यानांत येईल कीं, कर्त्याचीच योजना फार दूरदर्शीपणाची व अकलेची आहे. मन जर एकमार्गी केलें असतें तर वस्तुसृष्टींत एवढें वैचित्र्य व मनोहरत्वच निर्माण होतें ना. दुसरें, नियतच आकार असता तर पदोपदीं त्रास होता. आपण प्रवासाला निघतांना बरोबरचें सामान पिशवींत भरतों, तेव्हां सदैव नियत आकारानेंच असणारे जे फराळाचा डबा इत्यादि धातू वगैरेंचे पदार्थ ते जशी अडचण करितात, तशी मुकटा वगैरे वस्त्रें करीत नाहींत, तीं असेल तशा जागेंत कोंबतां येतात. याही पेक्षां दुध पाणी वगैरे द्रव पदार्थ

सोईचे पडतात. तुम्हांला इष्ट तशा आकाराच्या पात्रांत घाला त्यांची तयारी आहे. त्याचप्रमाणें मनाचें नैकाकारत्व हा दुर्गुण नसून सद्गुणच आहे. तें इतर सहस्र आकार धरूं शकत असलें, तरी तुम्हांला इष्ट तो आकार धरण्यास जोंपर्यंत तें सिद्ध आहे; तोपर्यंत तुम्हांला फिर्यादीचें काय कारण आहे? तुम्हाला इष्ट तोच आकार तुम्हीं त्याला द्या इतर देऊं नका; संपलें. नक्षत्रें पाहण्याची दुर्बीण घोड्यावर चढविलेली असते व ती अनंत आकाशांत वाटेल तिकडे फिरवितां येण्यासारखी खुली असते. परंतु, तिच्या बुडाशीं एक खीळ असते. व ती पिळली म्हणजे तुम्हाला ज्या बिंदूकडे ती स्थिर होणें इष्ट असेल तशी ती होते. झालें काम. त्याचप्रमाणें मन जरी वाटेल तिकडे फिरणारें असलें तरी त्याच्या बुडाशीं देवानें बुद्धिरूप (निश्चयात्मिका) खीळ करून ठेविली आहे. ती खीळ घट्ट केली म्हणजे मनाची लटपट बंद पडते. तेव्हां ही सोय अधिक चतुराईची कीं मन एकमार्गी असणें अधिक सोईचें, हें शहाण्यांनींच तपासावें.

* * * *

८९. एखादी म्हैस अति रांठ असते, तिला घे म्हटल्या सुकी धारा फुटत नाहीं. त्या वेळीं चरवींत बाहेरचे दुधाचे दोन थेंब घेऊन ते सडांना लावावे तेव्हां मग ती दूध सोडिते. त्याचप्रमाणें कधीं कधीं कांहीं लोकांचें हृदयांतील ईश्वरी भावनेला बाहेरून

धक्का बसावा लागतो म्हणजे ती उठून येते. आकस्मिक प्रसंगानें किंवा साधूचे सहज दर्शनानें किंवा चरित्रश्रवणानें एकदम वृत्ति बदल पडलेल्यांचीं जीं उदाहरणें ऐकितों, त्यांतील मर्म हेंच आहे.

९०. गारगोटी ही दगड; खडीसाखरही दगड व बर्फाचा तुकडाही दगडच. परंतु, बर्फ **सदैव** आर्द्र, खडीसाखर **बाह्यजल-स्पर्शानंतर** आर्द्र व गारगोटी **जळांत बुडवूनही** ठणठणीत! तिला जेव्हां मुशींत घालावी तेव्हांच ती द्रवणार ( रसरूप होणार. ) याचप्रमाणें माणसांच्याही तीन प्रती आहेत. कांहीं सदैव भक्ति-प्रेमरसानें द्रवत असतात, कांहींचा भक्तिरस बाहेरून ओलावा पोंचेल तेव्हां द्रवूं लागतो, व कांहीं विपत्तीचे भट्टींत घालून आटी-पर्यंत सुके ठाकच राहतात!!

*　　　*　　　*　　　*

९१. अलीकडे आगगाडीच्या दुसऱ्या वर्गाचे डब्यांत विजेचा पंखा असतो. तो गतींत असतांना जो पाहील त्यास धातूचें कीं कांचेचें एकच एक तबक मध्यें बसविलें असून तें सारखें गिरक्या घेत आहे असें खास वाटतें. परंतु जवळची कळ दाबून तें भ्रमण बंद पाडतांच, पहावें तो, एक तबक नसून पितळी चार पृथक् पृथक् पांकळ्या आढळतात. पहा बरें, **भ्रमणानें** सत्याचा केवढा तरी अपलाप केला आहे हा!

**९२.** एखाद्यानें अंधारांत राहून पेटलेली उदबत्ती गरगर किंवा उजवी डावी किंवा खालीं वर तिरकी अशी झरझर फिरवली असतां

पहाणारास तेजाचें किंवा अग्नीचें वर्तुल, रेषा, त्रिकोण इत्यादि आकृति भासतात ( परंतु, तीच उदबत्ति स्थिर धरतांच तेजाची मूळची ठिणगी तेवढीच दिसते. ) हा तरी भ्रमणाचाच परिणाम.

९३. सूर्याचे प्रकाशपट्टांत सात भिन्न वर्ण आहेत. ह्यांचें कांहीं विशिष्ट प्रमाण आहे. त्याच प्रमाणानें ते एका भिंगरीवर भरून तीं भिंगरी अतिशय वेगानें फिरविली असतां त्या सातां रंगांऐवजीं एकच म्हणजे शुभ्रवर्ण दृष्टीस येतो. व भिंगरी स्थिर झाल्यावर पूर्ववत् सातही रंग दिसतात. एथें तरी भ्रमणानें केवढा स्थितिविपर्यास केला बरें ?

९४. रज्जूचे ठिकाणीं जो खोटानाटाच सर्प भासतो, तो तरी आला कोठून ?—चित्तभ्रमांतूनच. आणि तो नाहींसा करण्याला दुसरी तिसरी कोणती खटपट असते ? कोणती नाहीं. दृष्टि जी तरल किंवा भ्रांत असते ती स्थिर करतांच, नागोबा आपला गाशा गुंडाळितात, व रज्जूची आपली ओळख होते !

९५. ह्या सृष्टीचा तमाशा तरी कोठून उभा राहिला ? चित्तभ्रमांतूनच, व हा मिटविण्यास दुसरें तिसरें साधन कशाला हवें ? एक चित्त स्थिर केलें म्हणजे हा आपोआप मिटून खरें गारुड काय तें सहजच ध्यानांत येतें. पण तें जोंपर्यंत केलें नाहीं तों हा असाच कायम राहणार. श्री सद्गुरुनृसिंहसरस्वती महाराजांनीं म्हटलें आहे, ‘ समस्त भ्रममात्र रचना। भ्रमणें कोणा नाकळे.’

*     *     *     *     *

९६. चित्त स्थिर केलें पाहिजे; पण तें साधावें कसें? एखादें मठ्ठ किंवा मेण्ये पोर असलें तर किंचित् दटावतांच गप्प बसतें, परंतु एखादि वात्रट अवलाद असली कीं, थपडांनाही दाद देत नाहीं. अशीला उलट घोडीच दाखविली पाहिजे, किंवा जेरबंदांनीं जखडू-नच टाकिलें पाहिजे, एरव्हीं तोड नाहीं. चित्ताचा वात्रटपणा तर सर्व विश्रुतच आहे, तेव्हां अशाला उलट घोडीवरच चढविलें पाहिजे

९७. कांहीं गवळी लोक गाईचें वासरूं प्रथम थोडेंसें चिटवून, त्यानें धारेंत त्रास न द्यावा म्हणून त्याला त्याच्या आईच्या पुढल्या तंगडीलाच खुंटवून ठेवितात. त्याचप्रमाणें या वात्रट चित्तालाही जखडून ठेवण्याची योगीजनांनीं खाशी तोड काढिली आहे. गायत्रीच्याच पायाशीं त्याला खुंटवून टाकावें म्हणजे झालें. किंवा "'सोहं हंसः' 'हंसः सोहं'" ही जी उलट घोडी चालली आहे, हीवर तें एकदां चढवून दिलें म्हणजे अडकलें; मग रंगल्या आपापच बंद पडतात. किती साधी व बेमालूम युक्ति, पण अनु-भव घेतल्यावांचून कळणार कशी?

९८. लोखंडादिक धातूंचें पाणी करून तें जर नुसतें भुईवर ओतलें तर तें बारावाटा धांवतें, परंतु एखादे विशिष्ट सांच्यांत ओतलें म्हणजे स्थिर होतें व थंड होईतों तेथेंच ठेवलें म्हणजे त्या सांच्याचा आकार घेऊन उठतें; त्याचप्रमाणें हें धांवरें चित्त मोकळें वाहूं दिलें असतां जरी बारावाटा धांवतें, तरी तें वरील

सांच्यांत ओतलें असतां धांवेनासें होतें व कायम थंड होईतों हालविलें नाहीं तर 'सोहं' चाच कायम ठसा घेऊन उठतें. मात्र जबरीनें ठरविलें पाहिजे.

९९. बाकी 'सोऽहं' चा ठसा घेतल्यानें तरी केवळ उरकलें असें नाहीं, तरी पण संपुष्टांत आलेंच. हजार धनको असले म्हणजे क्षणांत यानें उचकावें, क्षणांत त्यानें उचकावें. त्यापेक्षां एकच ठळक सावकार बरा. तशानें जरी कर्जमुक्ति नाहीं किंवा ओशाळगत मिटली नाहीं, तरी पदोपदीं भररस्त्यांत विचारणा होत नाहीं. याचप्रमाणें 'सोऽहं' च्या आश्रयानें जरी मुक्तिच झाली नाहीं, तरी विषयरूपीं हलकट सावकारांनीं वाटेल तेव्हां पदर धरण्याची भीति तरी मिटते!

१००. एकाची झाली तरी ओशाळगतच ती. किती झालें तरी पण परावलंबनच; अंमळ बरें, इतकेंच. यामुळें अशांत सुख असलें तरी तें मर्यादितच असणार. स्वावलंबन ऊर्फ स्वातंत्र्य याशिवाय पूर्णपणें सुख शक्य नाहीं! यासाठीं वेळ येईल तेव्हां याही आधाराला सोडून देऊन निरालंब किंवा स्वतंत्र रहातां येईल तें खरें सुख!

१०१. खरें स्वातंत्र्य म्हणजे निरालंबत्व किंवा आत्मवशता; हेंच खरें सुख. मनुही म्हणतो "सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखं" परंतु एकदमच हें कसें येणार? दर पांवलाला टेंकून

तोंडघशीं पडणाऱ्या लुल्यानें प्रथम प्रथम पांगुळगाड्याचा किंवा काठीचा आधार धरावा व त्या योगानें, होतां होतां तोल संभाळतां येऊं लागला व आपले पायांवर उभें राहतां येण्याइतकी पायांत ताकद आली म्हणजे काठी सोडून द्यावी, हीच रीत. आणि आंतराभ्यासांत तरी दुसरी रीत कोठची?

* * * *

१०२. धांवरें मन एकस्थायीं करण्याच्या ठळक ठळक तीन युक्त्या आहेत. प्रीति, भीति व विरक्ति. ( या कशा त्या आतां पाहूं.)

१०३. चित्तैकाग्र्याला हेतु, भीति, प्रीति व विरक्ति. प्रीति म्हणजे अत्यंतासक्ति व तिची निशाणी हीच कीं, आपले प्रीतीची वस्तु दृष्टीस पडतांच दर्शनसमकालींच सर्व दुःखांची किंबहुना स्वतः-चीही पूर्ण विस्मृति होऊन मन केवळ प्रियवस्तुमय होऊन आनंदांत निमग्न राहणें.

१०४. प्रीति ही जिन्नस फारच गोड आहे व हिला तो जीव एकदां चटावला त्याची स्थिति तुकारामानें म्हटल्याप्रमाणें "निमग्न तो सदां जैसा मकरंद" अशी होते. याचें उदाहरण; गोपी. त्या श्रीकृष्णाविषयीं अनन्यमनस्क असत, त्या प्रीतिमुळेंच.

१०५. उन्हाच्या तडाक्यानें जशीं शेतें करपतात, तशींच तीं थंडीच्या कडाक्यानेंही करपतात. काळोखांत जशी दृष्टि प्रसर पावत नाहीं, त्याचप्रमाणें अत्यंत भकास उजेडांतही पावत नाहीं. घमाशाच्या काढ्यानेंही पित्त बसतें व डाळिंबाच्या लेहानेंही

बसतें. याप्रकारें याविरुद्ध कारणांची कार्यक्षमता समान आहे; त्याचप्रमाणें प्रीतीचेंच कार्य भीतिही करिते.

१०६. गोपींना ज्याप्रमाणें "पततिपतत्रे विचलतिपत्रे शंकितभवदुपयानं" म्हणजे कुठें पान वाजलें तरी कृष्णच आला असा भास होई; त्याचप्रमाणें कंसालाही "पाहे अशनीं, शयनीं, पानीं, यानीं, वनीं, जनीं नयनीं" असाच अनुभव आला. मात्र एक प्रीतीचा परिणाम आणि दुसरा भीतीचा.

१०७. तुपाचें मोहन घातल्यानें पोळी नरम येते तशीच तेलाचे मोहनानेंही होते; तथापि तेलाहून तूपच अधिक आदरणीय. मोरोपंतही म्हणतात 'घृत सांडुनि करिल कोण आ तेला?' तसें एकाग्रतेचे कामीं प्रीतीची कामगिरी जरी भीति करीत असली तरी प्रीति अधिक ग्राह्य, ह्यांत काय वाद?

* * * * *

१०८. भीतीनें होणाऱ्या एकाग्रतेचा स्वानुभव झांशीच्या बंडांत सांपडलेल्या एकानें दिला आहे. झांशीचें बिजन ज्या दिवशीं सुरू झालें त्या दिवशीं तो गृहस्थ प्राणरक्षणार्थ धांवत असतां एका पडक्या भींतीच्या खबदडींत घुसला. तेथें जागा प्रादेशमात्र असून अगोदरच दोन स्त्रिया लपल्या असल्यामुळें याला जें उभें राहावें लागलें तें त्यांतील तरुणीचे छातीला छाती भिडवून रहावें लागलें, परंतु (तो गृहस्थ शपथेवर लिहितो कीं, )

त्या वेळीं उभयांपैकीं एकाचेंही मन बालाग्र कामविकृत झालें नाहीं. प्राण रक्षणाकडे सर्व लय लागलें होतें!

१०९. एखादे वेळीं शिळ्या भाताला मुंग्या आल्या असतां एका ताटांत तो भात घालून व भाताचे मध्यावर एका ओल्या **जाड पानाचा तुकडा** ठेवून तें ताट गरम होत चुलीवर ठेविलें असतां, चौफेर ताप झाल्यानें त्या सर्व मुंग्या त्या पानावर गोळा होऊन येतात. त्याचप्रमाणें मन चारी बाजूंनीं या संसारतापानें होरपळूं लागलें म्हणजे **वटपत्रशायी** जो बालमुकुंद त्याचे आश्रयाला सहजच जातें.

११०. ओंकारेश्वराचे पायऱ्यांवर ज्यांची दिव्य समाधि आहे, ते प्रसिद्ध साधु काळबोवा अक्षयीं ओरडत ‘काळ आला काळ आला; खातो, खातो, खातो व म्हणून त्यांचें ‘काळबोवा’ हें नांव पडलें. हे आपल्या शिष्यांस जो काळाचा इशारा देत यांतला हेतु तरी तोच. हितोपदेशांत ‘गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत्’ असें म्हटलें आहे. तें तरी हेंच.

१११. ‘भोगे रोगभयं, कुलेच्युति भयं, वित्तेषु राज्ञांभयं’ हा प्रसिद्ध श्लोक करणारानें मनाला चारी बाजूंनीं बागुलबोवा दाखवून निर्भय विष्णुपदीं कोंडण्याची युक्ति केली, ती तरी याच तत्त्वावर!

* * * * *

११२. एका गांवांत लक्ष्मीचें व अक्काबाईचें अशीं दोन समोरासमोर देवळें होतीं, एकानें लक्ष्मीची आराधना केली व दुसरा अधिक हिकमती होता त्यानें अक्काबाईची केली; व दोघांनाही गजांतलक्ष्मी मिळाली. त्याचप्रमाणें प्रीतीचें काम विरक्ति करते.

११३. आक्काबईचे आराधनेनें गजांतलक्ष्मी कशी मिळावी असें कित्येकांस वाटेल. परंतु तो उपासक चतुर असल्यानें त्यानें तिजपाशीं एवढाच वर मागितला कीं, आपण मजशीं पराङ्मुख असावें. त्याचप्रमाणें प्रस्तुतचे विषयाराधकांनीं विषयाची पराङ्मुखता प्रार्थावी म्हणजे काम झालें. ही विषय पराङ्मुखता म्हणजेच विरक्ति.

११४. पूर्वींचे शृंगारप्रिय भर्तृहरी विरक्त झाल्यावर एका आषक्त तरुणीला उद्देशून म्हणाले, 'ही कमलाक्षी आह्मांला डोळे घालून काय करते! पूर्वींचे आम्ही नव्हे, आतां हिनें हा चाळा सोडून द्यावा हीच आतां हिजपाशीं याचना.' इतकें वैराग्य बाणलें.

* * * *

११५. विषय, विषय हें काय बंड आहे? विषयाचे नावानें जो उठला तो वेदांती खडे फोडतो, हें काय? 'विशेषेण सिंचन्ति इंद्रियाणि मनश्चयेते' म्हणजे ज्यांचे ठिकाणीं इंद्रियें व मन बुडून पडून असतात असे पदार्थ. एखादें कुलीनाचें मूल जसें चटोर पोरांचे अड्ड्यावर ऊठपाय जाऊं लागलें असतां अब्रूदार आई-

बापांना वाईट वाटतें, त्याचप्रमाणें ज्ञात्यांना आमचे मनाबद्दल वाईट वाटतें, हें हिशोबीच आहे.

११६. वाईट वाटतें खरें, पण त्याला तोड काय? तोड उघडच आहे. एकतर आपलें पोर बंदोबस्तांत ठेवणें, किंवा त्या चटोरांची ह्याजवर छावली न पडेल असें करणें. यांपैकीं दुसऱ्यावर आपला ताबा किती चालणार?

११७. हें ध्यानांत आणून शहाणे लोक आपलेंच पोर कह्यांत ठेवण्याचा यत्न अनेक रूपांनीं करितात व म्हणून समर्थ 'सुसरीबाई तुझी पाठ मऊ' अशा न्यायानें द्वाड मनाला गोंजारून म्हणतात. 'मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें.'

* * * *

११८. प्रत्येक पदार्थाला जशा दोन बाजू असतात, त्याप्रमाणें एकच गोष्ट दोन उलट साधनांनीं सिद्ध होऊं शकते. शीतानें उष्ण शमतें, पण ऊष्णानेंही ऊष्ण मरतें. त्याचप्रमाणें प्रीतीचें काम विरक्तीही करितेच. असें जरी खरें, तरी साधनांत सुसाध्य व कष्टसाध्य हा भेद आहेच. शीतानें ऊष्ण शमणें प्रयोगकालींही सुख देतें व परिणामींही देतें. दुसरा उपाय केवळ परिणामींच, अर्थात् सुज्ञ या तारतम्यानेंच निवड करितात.

११९. कांटेरी रस्त्यांतून जाणें झाल्यास, गणितानें याला दोन उपाय येतात. एक सर्व कांटे झाडून टाकून मग निःशंक

चालणें, किंवा आपल्या पायांत बळकट बूट चढवून बेशक तुड-वीत जाणें. यांपैकीं दुसरा उपाय अधिक सुलभ व सुखावह म्हणून ज्ञाते तोच आदरतात. याचप्रमाणें विपद्रूप सर्व कांटे झाडून टाकीत बसण्यापेक्षां एक मनच घट्ट मजबूत करून ठेविलें म्हणजे संपलें. ( आधीं मन मुंडा, मग तुम्ही स्वहितचि धुंडा, ), ह्याचा तरी भाव हाच.

*    *    *    *

१२०. मनाचे द्वाडपणाचा बोभाट आहे खरा; पण वास्तविक पहातां मन जातीचें द्वाड नाहीं. तें सांगावें तें ऐकण्याजोगें आहे, मात्र ते संगतीनें नासलें आहे. 'वासना' म्हणून एक ठकाई मावशी आहे. ही चाहटळ भवानी याला चोरगस्तीनें घरांतून काढून विषयांचे चव्हाट्यावर नेते, व आपण वेगळी राहून त्या पोराला फशीं पाडते !

१२१. 'वासना' हा शब्द 'वस्' धातूचे प्रयोजकरूपापासून घडला. अर्थात् याचा अर्थ जी ( मनास ) नेऊन ( विषयांत ) वसविते किंवा बसविते ती, हा उघडच झाला. ती जर हयात राहिली तर आपले स्वभावावर जाणारच. याकरितां या सटवीचा बंदोबस्त प्रथम केला पाहिजे, म्हणजे मनाचा झालाच. हिची तंगडी मोडून लंगडी केली म्हणजे मन आपोआपच पांगुळलें ! कदाचित् स्त्रीहत्येचें हें पाप कोणास न करवले तर ह्या अवदसेला

एके खुंटावर टांपरून ठेविली तरी चालेल. याच हिशोबानें म्हटलें आहे "मना वासना वासुदेवीं वसूं दे!! या वासुदेवरूप खुंटाशीं हिला गुंतविली तरी कटकट मिटेल.

*  *  *  *

१२२. जो आपल्या तिजोरीच्या किल्ल्या भलत्याच्या हातीं देतो त्याला आपण मूर्ख किंवा व्यवहारशून्य म्हणून त्याचा उपहास करितों, हें जर खरें, तर तिजोऱ्या ह्या जिचीं केवळ उपकरणें आहेत अशी जी बिनमोल वस्तु 'सुख' तिच्या किल्ल्या विषयासारख्या रामोशांचे स्वाधीन करणारे आम्ही कितीपटीनें तरी मूर्ख व हास्यास्पद असलों पाहिजे? माझी मीनाक्षी मजकडे पाहून शुचिस्मित करील आणि मग मी सुखी होईन! कोण गुलामगिरी ही!

१२३. इंद्रियांचे गुलाम न होतां ज्यांना इंद्रियांचे लळे पुरवितां येत असतील ते किती तरी धन्य होत. परंतु ही हातोटी साधण्याला "पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः" म्ह० जो चक्षूवांचून पाहतो व कानांवाचून ऐकतो असें ज्याचें (परमेश्वराचें) श्रुतीनें वर्णन केलें आहे, त्याचेंच सांनिध्य झालें पाहिजे. त्याचीच शागिर्दी केली पाहिजे आहे, तर साधेल.

१२४. परमेश्वराची शागिर्दी मिळण्याला कोणाच्या शिफारसचिठ्ठीचें प्रयोजन नाहीं. त्याला कांहीं विकटोपर्यंत अध्ययन नको किंवा कांहीं विश्वविद्यालयाची परिक्षा उतरणें नको. त्या का

शिफारस एकच—अनन्य प्रेमा. नामदेवाच्या जनाबाईजवळ दुसरें काय होतें ?

*　　　*　　　*　　　*

१२५. हा प्रेमा म्हणजे तरी काय ? प्रीति किंवा भक्ति, किंवा अत्यासक्ति किंवा गोडीच होय. "नामामृत गोडी वैष्णवा लाधली' या वाक्यांत या प्रेम्याचेंच वर्णन आहे.

१२६. या गोडीची, या आसक्तीची ओळख विषयीं जीवाना नाहीं असें नाहीं. विषयप्रीतीचें आणि परमात्मप्रीतीचें गोत्र कांहीं वेगळें नाहीं. स्थानमात्र वेगळें. रात्रभर दिवे जाळून पैची चूक शोधीत बसणाऱ्या पंडित मोरोपंतांना कारकुनाचे भगवद्भक्त बनविणाऱ्या बाबूराव बारामतकरांनीं प्रेम नवें शिकविलें नाहीं. पण त्याचें स्थान बदलविलें, असेंच नव्हे काय ?

१२७. कामांध होऊन, पडते पावसांत काळोखे रात्रीं फोंफावणारी महानदी उतरून जाऊन प्रियेच्या महालांतील खिडकींतून लोंबत असलेला सर्प रज्जुस्थानीं करून महालांत शिरणाऱ्या उल्लू तुळशिदासाच्या प्राणप्रियेनें मोठासा गुरूपदेश तो काय केला ? "ह्या माझ्या शेंबडे देहावर ही जी आसक्ति ठेविली आहेस, हीच श्यामसुंदर प्रभूवर ठेव;" ह्यापलीकडे तिनें काय सांगितलें ? पण तेवढ्या फटकाऱ्यानें दिशा बदलतांच "श्वानाचा" "साई" झाला.

१२८. पूर्वेला जाणें किंवा पश्चिमेला जाणें हा केवळ सुकाणूं

फिरविण्याचा खेळ आहे. गलबताच्या गतींत फारसा फेर अवश्य नाहीं. याचप्रमाणें विषयप्रेम कीं परमात्मप्रेम यांत जातिभेद नाहीं, दिशाभेद आहे. गटारांत नळ पडतो आहे तो हौदांत पाडणें इतकेंच.

१२९. दगडांचे हिशोबांचे त्रैराशिक सोडविण्याची रीत आणि सोन्यामोत्याच्या हिशोबाचें त्रैराशिक सोडविण्याची रीत निराळी नाहीं. पांच दगडांना रु. १० तर २५ दगडांना ज्याप्रमाणें ५० हें उत्तर; त्याचप्रमाणें ५ मासे सोन्यास १० रु. तर २५ माशांना रु. ५० किंमत, हेंच उत्तर. अर्थात् रीति तीच. याचप्रमाणें संसाराचें त्रैराशिक सोडविण्याची रीत, तीच परमार्थाचा हिशोब उलगडण्याची रीत. मात्र दुसरीचें माप थोडें नाजूक इतकेंच.

१३०. स्वानुभवी मयूरपंडितांनीं जीवांना सांगितलें कीं, 'जैशी अभिरुचि विषयीं तैशी परमेश्वरीं घडेल जरी। तरि मग काय उणें बा चारी पुरुषार्थ राबतील घरीं' हें म्हणणें वरील हिशोबाला तंतोतंत जुळतें; नाहीं काय?

* * * *

१३१. सोनार सोन्याचे दागिने घडतो ते लोखंडाच्या हातोडीनें घडतो, परंतु तें सोनें जसें बावनकशी असेल तशी त्याची झळाळी उठते. तिशीं लोखंडाचा संबंध नाहीं. त्याचप्रमाणें कधीं कधीं उपदेष्टा सामान्य किमतीचा असला तरी ज्याबर त्याचे उपदे-

शाचा व्यापार होतो तो जर बावनकशी असेल तर भलतीच झळाळी घेऊन उठतो. मोरोपंतांचे बाबूराव नाईक किंवा तुळशी-दासाची पत्नी हीं कोणतीं परमहंस कोटींतील माणसें होतीं? बावन कशी प्रेमाचा संग्रह करून ठेवला असतां, त्याला घाट देणारा कोणीही मिळेल.

*  *  *  *

१३२. हा प्रेमा, ही प्रीति, ही आसक्ति, ही गोडी कशी असावी? तर आदर व विश्वास यांनीं युक्त असावी. आंबरस गोड खरा. अमृतरसच तो. तरीही त्यांत थोडीशीं मिरपूड व साखर मिसळल्याशिवाय त्याला लज्जत नाहीं. त्याचप्रमाणें प्रीतींतही आदर व विश्वास यांची छटा पाहिजे. खेरीज खरी मिठाई नाहीं.

१३३. स्त्रीपुरुषांतील प्रेमच घ्याना, तेथें तरी स्त्रीचें प्रेम म्हणजे लवाळपणा नव्हे. त्याला काय चव? तें पाचकळ. त्यांत पतीबद्दल आदर व विश्वास हीं दोन्ही असल्याशिवाय, तें रुचीला चढत नाहीं.

*  *  *  *

१३४. आदर याचा अर्थ काय? 'आ' म्ह० किंचित् किंवा ईषत् "दर" म्ह० भय किंवा कंप. पति दृष्टीस पडतांच जरी प्रेमोद्गम पाहिजे, तरी त्याचेही पूर्वीं 'अगबाई येणें झालें.' असें

वाटतांच तिनें पसरलेले पाय आटपून चपापून उठून उभें राहिलें पाहिजे. त्याचप्रमाणें परमात्म्याचें नांव कर्णपथावर येतांच, प्रसंगीं अस्ताव्यस्त असलेलें मन चपापून खडें झालें पाहिजे.

१३५. मनु म्हणतात ' ऊर्ध्वं प्राणा उत्क्रामंति यूनः स्थविर आगते ' म्हणजे कोणीही वृद्ध ( वडील ) मनुष्य दृष्टीस पडला असतां तरुणाचे (लहानाचे) प्राण (भयानें) वर येऊं लागतात ( लागावे ) ते वृद्धाला उत्थापन व अभिवादन केल्यावर खालीं पडतात. (बाकी आजकाल वडिलांपुढें तंगड्या ताणून चिरूट ओढीत पडणारे तरुण महाग नाहींत; तें असो. पण मनूची आज्ञा अशी आहे. )

१३६. कांकडी किंवा खिरा हें फळ गोड खरें, गोड नव्हे, गोडच गोड. पण त्याचे तोंडाची किंवा डेंखाची खपटी चाखून पहातां किंचित् कडसर असते. त्याचप्रमाणें प्रेम ही गोडच गोड वस्तु खरी, परंतु तिच्या तोंडाशीं थोडा आदर पाहिजे. मिरपुडीवांचून आंबरस बाधतो.

१३७. प्रेमाचे तोंडीं जसा आदर ( किंचित भय ) तसा अंतीं विश्वास ( अत्यंत निर्भयपणा ) पाहिजे. ज्या प्रेमांतून विश्वास पैदा झाला नाहीं तें प्रेमच नव्हे. तो चव्हाटळपणा किंवा वंध्याविलास आहे.

*　*　*　*

१३८. विश्वास विश्वास तो काय? 'वि' म्हणजे विशेष किंवा पूर्णपणें किंवा मोकळेपणें श्वास टाकणें. (breathe freely म्हणजे तरी काय? अनुभवी जाणालातच कीं, मन पूर्णपणें निश्चिं निर्घोर किंवा निर्भय झाल्याशिवाय आपला श्वास खुला किंव मोकळा वहात नाहीं. कोंडलेला असतो. एखादें संकट दूर झालें एखादा कार्यभार उतरला, म्हणजे आपण मोकळेपणें लांबरुंद सुसकारा सोडतों. ती या विश्वासाचीच निशाणी.

१३९. माझा पति सन्निध आहे, आतां मला कसली चिंता, अशा प्रकारचा जो स्त्रीचे हृदयाचा प्रत्यय तोच हा विश्वास. त्याचप्रमाणें परमात्मा माझा वाली आहे, आतां मला कशाची चिंता, मी खुशाल घोरत पडेन. मोरोपंत म्हणतात. 'ज्यातें स्मरुनि निजावें स्वस्थ स्थापूनि शीर्ष अंकीं.' त्याप्रमाणें प्रत्यक्ष शत्रूच्या (कामक्रोधादिकांच्या) मांडीवर उसें ठेवून निजलों तरी मला भय नाहीं, एतदाकार जो प्रत्यय त्याचें नांव विश्वास.

१४०. नरसिंह मेहत्याची हुंडी भरणारे सावकार, दामाजीचा रसद मागणारे विठूधेड, हे कोठून आले? या विश्वासांतूनच. एरव्हीं आमचे मेहेताजीचा किंवा दामाजीचा श्वास कोंडता; पण मग परमेश्वरावर विश्वास तो काय?

१४१. कांहीं आंबे जात्याच गोड खोबऱ्यासारखे रुचकर असतात, तथापि पिकल्याशिवाय त्या गोडीची पूर्णता नाहीं; त्याच-

प्रमाणें प्रेमा हा जरी जात्या गोड झाला, तरी तो विश्वासावस्थेला पोंचल्याशिवाय त्याचें खरें सार्थक नाहीं.

१४२. प्रेमा, प्रीति, भक्ति, गट्टी, दोस्ती, आसक्ति हे बहुतेक समानार्थकच धरून चालण्यास हरकत नाहीं; व यांपैकीं कोणाचीही व्याख्या केली तरी एकच. प्रीती किंवा भक्ति ही मिळवणी आहे; व म्हणूनच लौकिकांत प्रीतिबद्ध जीव एकमेकांस नीरक्षीरलिंगनें देऊन एकमेकांत घुसतात किंवा एकजीव होऊन जातात. व अप्रीति किंवा विरक्ति किंवा वैर ही वजाबाकी आहे व म्हणूनच वैरी परस्पर दर्शन होतांच उलट दिशेला मुसकी फिरवितात. (+) मिळवणीचें चिन्ह व (—) हें वजाबाकीचें चिन्ह तरी काय दाखवितें ?

१४३. म्हण आहे 'एक गोरी आणि हजार खोड्या चोरी' म्हणजे नवऱ्या मुलीला एक झकीझक गौर वर्ण अनुकूल असला म्हणजे तिचे रूपांत इतर कितीही न्यूनत्व असलें, तरी तें झांकलें जातें (आड येत नाहीं.) त्याचप्रमाणें जीवाजवळ एक उज्ज्वल व उत्कट भक्ति असली म्हणजे मग त्याचे ज्ञानांत कितीही दोष किंवा न्यूनत्व असलें तरी तें आड येत नाहीं!

१४४. हिचेच उलट म्हण आहे कीं, 'सारी नवरी चांग आणि एका डोळ्यांत वांग' म्हणजे नवरी मुलगी इतर अवयवांत नाक्लिष्ट आहे, परंतु डोळ्यांत बटबटीत वडस वाढला आहे, तर

काय कामाची? त्याचप्रमाणें ज्ञानाच्या गोष्टी भरपूर आहेत, परंतु भक्तीचे नांवानें आंवळ्याएवढें आहे, तर त्या ज्ञानाचें साफल्य काय?

१४५. प्रीति किंवा भक्ति ही **मिळवणी** आहे; व म्हणूनच "**विभक्ति नव्हे ती भक्ति**" असें समर्थांनीं म्हटलें आहे. **मिळवणी** आहे, म्हणजे भक्ति किंवा प्रीति ही अर्थांत **बळकटी** आहे; एक **शक्ति** आहे. व त्याचे उलट, वैर किंवा अप्रीति किंवा **अभक्ति** हें **दौर्बल्य** आहे,–निःसत्वता आहे.

१४६. प्रीति हा **विस्तार** आहे, व अप्रीति किंवा **अभक्ति** हा **संकोच** आहे. दोघा स्नेह्यांचीं बिऱ्हाडें एका जागीं असल्यास प्रत्येकाला दुप्पट जागा असते; दुष्मानांचीं असल्यास निमपट किंवा मुळींच नसल्यापैकीं होतें.

१४७. पहा बरें दूध व पाणी यांची प्रीति आहे, गट्टी आहे किंवा ऐकरस्य आहे, यामुळें दुधांत पाणी मिसळलें असतां, 'तुझें तें माझें आणि माझें तेंही माझें म्हणून म्हणतात' त्याचप्रमाणें दूध तें दूध व पाणी तेंही दूध होऊन जातें. त्याचप्रमाणें प्रेमी भक्त परमात्म्याशीं संगत होऊन उभयही परमात्मतेला भोगितात.

१४८. **श्री सद्गुरु नृसिंहसरस्वती** महाराजांनीं म्हटलें आहे 'उदकबिंदु समुद्रीं पडे! तो समुद्रचि होऊनि वाढे!' उदकाचा यःकश्चित् बिंदु तो काय, पण तो समुद्रांत पडतांच सर्व

समुद्रभर होतो; नव्हे; समुद्ररूपच होऊन वाढूं लागतो; असें म्हण-णेंही अतिशयोक्ति नव्हे. त्याचप्रमाणें जीव जरी किंचिज्ज्ञ असला तरी तो त्या ज्ञानसमुद्राशीं एकरस झाला असतां त्याचेही अंगीं सर्वज्ञता येते, हें हिशोबीच आहे.

१४९. एखादा दीडदमडीचा मनुष्य, पण, तो सेवासंबंधानें सार्वभौमसत्तेशीं संलग्न असतांना मोठमोठ्या अमीरानांही आपल्या एका शब्दानें गादीवरून खालीं खेंचतो. याचें रहस्य काय बरें? त्याचें त्या सत्तेशीं एकजीव होणें हेंच. तोच त्या सत्तेंतून दूर होऊं द्या कीं, त्याला वाटेंतील कुत्रेंही भीत नाहीं. हा न्याय जर खरा, तर परमात्म्याचे दृढ भक्तांना काळही कांपावा, यांत गैरहिशोबी तें काय?

१५०. जुन्याकाळीं इमारतींच्या दगडी जोत्यांत लोखंडी कड्या गाडलेल्या असतात व त्यांस घोडे, उंट, हत्तीही बांधतात. खरें पहातां हत्तीसारख्याला रोखून ठेवणें हें त्या केवळ कडींचें सामर्थ्य नसून त्या पाषाणमय जोत्याचें आहे. या न्यायानें पाहतां शिव-लिंगाला घट्ट विळखा मारणाऱ्या मार्कंडेयानें यमाजी भास्करास रोखून धरावें हें सरळच आहे!

१५१. एखाद्या शतदारिद्र्याची मुलगी रूपानें सुरस असल्यानें एखाद्या लक्षाधीशाशीं लग्न लावून त्याची अर्धांगी होते व तत्काळ त्या सर्व अफाट संपत्तीची स्वामिनी होते. वास्तविकपणें त्या संपत्तिपैकं

चार दमड्याही तिनें स्वकष्टानें मिळविलेल्या नसतात; परंतु, केवळ त्या लक्ष्मीपतीशीं संलग्न होऊन **अभेद्भाव** पावल्यानेंच तिलाही त्याचें वैभव येतें. घरांत नकारघंटा वाजत असतां, नदींत हात घालतांच ओंजळभर परीस तुकारामानें काढून दिले, त्यांत लक्ष्मीपतीशीं अभेद-रूप होण्यावांचून दुसरी तिसरी हिकमत कसली आणि कशाला हवी? तुकोबाचे तोंडांत मारिली असतां विठोबाचा गाल सुजावा याहून या **अभेद्रूपाचा** निराळा पुरावा कोणता द्यावा?

१५२. जीवांनीं 'उरीं डोंगर शिरीं कांटे' करून आपले छातीवर संपत्ति गोळा करीत बसण्यापेक्षां वरील कुमारीचे अनुयायी बनून लक्ष्मीपतीला आत्मार्पण करणें हा सकल संपत्ति मिळविण्याचा सुलभ मार्ग आहे. तुकाराम म्हणतात 'समर्पिला नाहीं जीव, जाणावा हा व्यभिचार.'

१५३. त्या कुमारीचेंच उदाहरण घेऊन चाललों तर खऱ्या खऱ्या आत्मार्पणांत पडदा उपयोगी नाहीं. खऱ्या रसिकांना वस्त्र किंवा आभरणें ह्याचा देखील अडथळा खपत नाहीं. त्याचप्रमाणें परमात्म्याशीं खऱ्या प्रेमानें संगत होतांना किंवा आत्मार्पण करितांना मायेचा पडदा किंवा विषयांचीं आभरणें दूर केलीं पाहिजेत. नाहींतर तीं घात करतील.

१५४. कोणी म्हणतील कीं, मायेचा पडदा व विषयांचे संभार दूर फेंकण्यास सांगतां, तर शहाण्याच देवानें हे अंतराय मूळ

निर्माणच कां केले ? तर त्यांस आमचे असें म्हणणें कीं, त्या सुंदरीचा नवरा आपल्या हौशीनें व आपल्या हातानें तिला भर्जरी शालू नेसवितो व उंची अलंकार चढवितो; तथापि एकांतांत तोच तिला ते सर्व दूर उतरून ठेविण्यास सांगतो. त्याचप्रमाणें हे विषयभार व हें मायावरण परमात्म्यानेंच निर्माण केलें, असें जरी घटकाभर धरून चाललों, तरीही त्याच्याशीं संगत होतांना हीं दूर ठेवण्यास सांगण्यानें तो अन्यायी ठरतो असें म्हणणें हें चुकीचें आहे.

*　　　*　　　*　　　*

१५५. कारण, अन्यायाचें बीज वैषम्यांत असतें. जेथें समत्व आहे, तेथील स्थिति कितीही कष्टद असली, तरी अन्याय्य म्हणतां येत नाहीं. सुदामा स्वतःच कण्या खात होता, तेव्हां त्यानें लक्ष्मीपतीलाही कण्यांचीच मेजवानी केली असतां त्याला कोणी पाजी किंवा अन्यायी म्हटलें नाहीं ! तोच जर स्वतः जिलबी खाऊन देवाला कडबोळें दाखविता तर सात पाजी गणला जाता ! त्याप्रमाणें देव जर भक्तास कफल्लक होऊन भेटावयास सांगतो, तर तोही त्याशीं आडपडदा राखीत नाहीं हें उघडच झालें.

*　　　*　　　*　　　*

१५६. सुंदरीच्या देहास आच्छदणारा शालू जरी साडेतीन हात रुंद व वीस हात लांब इतका विस्तृत असला, तरी त्याची स्थिति एका नीवीचे आधारावर असते; त्याचप्रमाणें मायेचें आव-

रण कितीही लांबरुंद असलें तरी त्याची उभारी अहंकाराचे म्ह० मीपणाचे ग्रंथीवर आहे, ती फेडली म्हणजे या मायेचें आवरण कितीही विस्तृत असलें तरी गळून पडतें !

*　　　*　　　*　　　*

१५७. महिपती यांनीं म्हटलें आहे 'नरहरीनाथगुरुचरणीं रत महिपती हा दिनरजनीं ॥ मीपण टाकलें पुरून, मसीं वेडचीं मेलें भरून "॥ नामदेव म्हणतात "अहंकाराचा वारा न लागो माझ्या ( विष्णु दासा ). समर्थ म्हणतात. "अहंभाव हा थोर शत्रू जिणावा" या प्रकारें जो तो सत्पुरुष या अहंकाराचे नावानें—या मीपणाचे नावानें—ओरड करितो.

१५८. याच मासल्याची हाकाटी या अहंकाराबद्दल सर्वज्ञात्यांची आहे. समर्थ म्हणतात "जुनें ठेवणें मीपणें तें कळेना" "म्हणजे जुनाट ठेवा जो परमात्मा" तो ह्या अहंकाराच्या पडद्यामुळें दृष्टीस येईनासा झाला आहे. वडिलांनीं मोहरांचे हांडे भुयारांत ठेविलेले असतां पुत्राला जर चौपदरीची वेळ आली, तर माहितगाराला वाईट वाटल्यावांचून कसें रहावें ! त्याच न्यायानें सत्पुरुषांस आम्हांकडे पाहून वाईट वाटतें.

१५९. पण मोहोरांचे हांडे घरच्या भुयारांत असून चौपदरी कां ?—तर—त्यांवर मोठा थोरला भुजंग बसला आहे; अगदीं जातिवंत आहे; वर दहाचा आंकडा टळटळीत दिसतो आहे. तर

अशाचे टकऱ्यांत धैर्यानें काठी घालून, निधि आपलासा केला पाहिजे. किंवा काठी घालण्याची छाति नसेल, तर कोणा मांत्रिकाडून तो उठविला पाहिजे. असा बुद्धिवाद कोणताहि शहाणा मनुष्य देईल.

१६०. समर्थासारखे माहितगार जर आम्हांस आमचे खुद्द घरांतील भुयारांत म्हणजे देहांतील गुहेंत हा पुराण ठेवा असल्याची खात्री देतात तर त्या विश्वासावर आम्ही विवेकरूप दंडानें या दशेंद्रियरूपी **दहाचा आंकडा** छातीवर घेऊन डौलानें फणा उभारणाऱ्या अहंकाररूप भुजंगाचें टकलें फोडलें पाहिजे, किंवा हें धैर्य नसेल, तर **सद्गुरुरूप मांत्रिकाला** गांठून त्याचे मंत्रबलानें त्याला तेथून उडविला पाहिजे. असून भीक कां मागावी?

१६१. खरोखरच हें रूपक कांहीं तरी नव्हे, सुवर्णाचा हांडा भरलेला आहे. नवीन मिळावावयाचा नाहीं. फक्त हा अडथळा दूर करावयाचा आहे. अभ्यासी लोक जाणतातच कीं, साधकाची काय ती शिपाईगिरी हा भुजंग हाणून पाडण्यांत आहे. तेवढी साधली म्हणजे ठेवा हातीं आल्यासारखाच आहे. यासाठीं अहर्निश हा अडथळा दूर करण्याचा यत्न केला पाहिजे.

१६२. केला पाहिजे; नव्हे—केलाच पाहिजे. कारण हा अहंकार मोठा प्रभुद्वेषी आहे. व या द्वेषाची निशाणी त्याचे रूपांतच आहे. कारण, अहंकार शब्दाचा अर्थ पाहतां अ-हं-कार यांतील

'कार' म्हणजे करणारा! अ म्हणजे नञर्थ किंवा निषेध अथवा अभाव आणि 'हं' म्हणजे 'हंस' स्वरूप परमात्मा. अर्थात् जो परमात्म्याला नाहींसा करूं पाहतो किंवा त्याचे भेटींत अंतराय आणितो तो. अर्थात् अशाचा सर्व ईशभक्तांनीं उच्छेदच केला पाहिजे, समर्थांनींहि 'अहंकार हा थोर शत्रू जिणावा.' असेंच सांगितलें आहे.

१६३. अहंकार हा स्वस्वरूपाचे आड आलेला मोठा पडदा आहे. हा दूर केल्याशिवाय आत्मरूप दिसत नाहीं. हा आत्म-सूर्याचे तोंडाआड आलेलें मेघडंबर आहे; हें वितळल्याशिवाय किंवा अन्यत्र उडवून दिल्याशिवाय आत्मसूर्याचा किरणही दृष्टीस यावयाचा नाहीं.

१६४. अहंकार हा बहुत बहुत दिवसांचा संबंधी किंवा स्नेही आहे आणि यामुळें, तो दुर्गुणी आहे असें लक्षांत आलें तरी, माणसाला मुरवत पडते, उडवून देववत नाहीं. परंतु आपलाच पाय सडला तर कापून काढावा लागतो, त्याप्रमाणें येथेंही 'असंग शस्त्रेण दृढेण छित्वा' हाच कायदा अमलांत आणिला पाहिजे; भलतीच प्राणघेणी भीड काय कामाची?

१६५. अहंकार हा स्वरूपाचे आड येणारा पडदा आहे म्हणून म्हटलें; त्याचा अनुभव आहे. संस्कृतांत पडद्याला "तिरस्करिणी" असें म्हणतात. आणि व्यवहारांतही आपण पहातों कीं

जे कोणी परमात्म्याचा तिरस्कार करितात त्यांचे ठिकाणीं या अहंकाराचें वास्तव्य जास्त. खुद्द भगवंतांचीही या बाबतींत साक्ष आहे. "ईश्वरोहं, अहंभोगी, कोन्योऽस्ति सदृशो मया" ( गीता) हे भगवंताचे उद्गार असल्या लोकांचेच निदर्शक नव्हेत काय?

* * * * *

१६६. या नागोजीचा ( अहंकाराचा ) नक्षा उतरावयास फार यत्न नकोत. 'मीं असें बोलतों, मी तसें बोलतों, मी यंव करितों मी त्यंव करितों,' अशा प्रकारची हा शेखी मिरवूं लागला म्हणजे त्याला स्पष्ट विचारावें कीं, "ठीक आहे. तूं यंव करितोस ना? तूं मोठी तरवार मारतोस ना? अर्धांग होऊन तुझा हात लटका पडला, आतां मार पाहूं? तूं मोठा वक्ता ना? जिभवरून वारें-गेलें, आतां बोल पाहूं? या प्रश्नां पुढें बच्चाजींची फेपरीच बंद होते!

१६७. कधीं कधीं त्याला आपले शास्त्रीय विज्ञानाची घमेंड वाटत असते; तेव्हांही त्याला असाच आडवावा, प्राणवायु आणि जलजवायु यांचे प्रमाणशीर मिश्रणानें तुला जल निर्माण करितां येतें व डिनमाइटनें मेघ चाळावितां येतात ना? फार नामी. मग आतां हे सृष्टीवर दुष्काळ आणि हीं अवर्षणें कां? याप्रमाणें त्याला कैचींत धरून सीतेची जागा भरूं पाहणाऱ्या शूर्पनखेला रामानुजानें जें बक्षीस दिलें तेंच बक्षीस खऱ्या अंतर्यामीची जागा भरूं पाहणाऱ्या या अहंकाराला पदोपदीं देत राहिलें पाहिजे, तरच कांहीं जीवांना सद्गति मिळेल!

१६८. हा मोठा भपकीबाज आहे. याच्या घुलकावणीला बडे ाडे बधून तोंडघशीं पडले आहेत. याचा आश्रय करून या संसार-ादींत उतरला, त्याची स्थिति कापसाचा गठ्ठा पाठीवर घेऊन ाोल पाण्यांत शिरणाऱ्या बैलाप्रमाणेंच होते. भार अधिकाधिक ोत जाऊन अखेर जलसमाधीच प्राप्त होते. याचे उलट जे खरे शहाणे आहेत, ते सबरसाची [ पक्षीं—परमेश्वराची ( रसो वै सः ) परमेश्वर हा सर्व व्यापी असा रस आहे ] गोणी घेऊन जे भव-नदींतून उतरतात, त्यांचा भार हलका हलका होत जाऊन ते अचुक परतीराला जातात.

१६९. प्रसिद्ध साधु तुकाराम त्यांची सुप्रसिद्ध पत्नी हिनेंही ( अहंकाराची ) कापसाची गोणी पाठीवर घेऊन संसारनदींत प्रवेश केला होता, व ती तिच्या भारानें पदोपदीं केंकाटत होती; तें पाहून आमचे सबरसमय साधु ओरडले "तुका म्हणे + + न करितां विचार, घेऊनीयां भार कुंथे माथां." जो संसार तुकोबाचा तोच त्याच्या स्त्रीचा, पण तुकोबा आनंदांत तरंगत होते व ती भारावून केंकत होती, यांतील हेतु काय?

* * * *

१७०. वाऱ्याचे सहज लहरीबरोबर दिव्य पुष्पांचा टप्टप् वर्षाव करणाऱ्या पारिजातक नामक कल्पतरूप्रमाणें सहज लहरी-

१ हिंदुस्थानांत मिठाला 'सबरस' म्हणतात.

बरोबर, ज्यांचा परिमल स्वर्गापर्यंत दुमदुमून राहिला आहे असल्या अभंगरूप दिव्य पुष्पांचा ज्याचे मुखांतून अखंड वर्षाव चालावयाचा, त्या गृहस्थानें, आपुलीया बळें नाहीं बोलवत सखाभगवंत, वाचा त्याची ॥ काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें। पारि त्या विश्वंभरें बोलाविलें ॥ हे उद्गार काढणें म्हणजे त्याला आजच्या अहमहमिकेच्या काळांत वेड्याच्या इस्पितळांतच पाठविण्याची पाळी यावयाची!

१७१. परंतु, या वेड्याचें भाग्य आम्हां करंट्यांना कसें यावें? विचार करा, "सखा भगवंत" हीं अक्षरें उच्चारणाराचें भाग्य काय व अधिकार काय असावा! षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवानाचें सखित्व करण्यास तोहि पुरुष त्याचे तोलाचाच नको काय? कारण, 'समानशील व्यसनेषु सख्यं ॥' अशी ह्मण आहे. आणि ती खरीच असावी. कारण समर्थ म्हणतात, 'देवभक्तां नाहीं भेद.' कोण हा अधिकार त्या वेड्याचा! आणि मिळाला कशानें? निरहंकारत्वानें!

*            *            *            *

१७२. सुषुप्तींत हा नागोजी जरी केवळ ठिकाणा सोडून अन्यत्र जात नाहीं; तथापि लपून असतो; तरी तेवढ्यानेंच किती, सुख होतें! व त्या ज्योतिर्मयपर पुरुषाची, पडद्यां आडूनच खरी पण चुटमुटती दृष्टादृष्ट होतें, तर तितक्यानेंच आनंदडोहांत मग्न झाल्याचा जीवास अनुभव येतो! तेव्हां ज्यांनीं या नागोजीला

कायमचा हुसकून देऊन पर पुरुषाची निरंतर (अंतर नाहीं अशा प्रकारें) गट्टी केली, त्यांचे सुखाला पारावारच नसणार हें स्पष्टच नाहीं काय?

१७३. शेंकडों जीवांना अशी जबर शंका आहे कीं, हा अहंकाररूप घोडा जर ढिला पडला तर मग कार्याचा बार उडेल कसा. त्यांचे मतें हा अहंकार उभा आहे, म्हणून सर्व क्रिया होत आहेत. परंतु आमचें हें यंत्र पुरातनकाळीं आहे, आधुनिक नव्हे! हिला घोडा नको आणि केपही नको! हिचे कानांत ठिणगी पडली कीं, हिनें धडाडा बार उडतो. आणि ज्योतिर्मयाचें सांनिध्य झाल्यावर ठिणगीला काय तोटा?

१७४. या अहंकाराचा खडक काढून टाकिला जाईल, तर खरोखरच ह्या जीवितनदीचा प्रवाह खळखळीवांचून, भोंवऱ्यावांचून किती तरी शांत व सुखकरपणें चालून वाटेल तशी लहान मोठीं नाव क्षेमरूपानें परतीराला जाऊं शकेल. परंतु, हा अवघड खडक दिवसानुदिवस पोटांतून अधिकाधिक वर वाढत चालल्यामुळें मोठीं मोठीं तारवेंही यावर आदळून त्यांचा चक्काचूर होऊन जात आहे. असो, हा उखडण्याचें सामर्थ्य नसेल, तर याचे जवळ कुलाबा दांडीसारखा दिवातरी लावून ठेवावा म्हणजे कांहीं तरी बचाव होईल. म्हणून सत्पुरुषांनीं या गोष्टीचा प्रकाश केला आहे.

१७५. कित्येकांचा समज असाही आहे कीं अहंकार सुटल

त्या माणसांत काय राहिलें? विरी गेलेला चुना आणि अहंकार-हीन माणूस एकच; किंबहुना निरहंकार माणूस म्हणजे अजागळ किंवा पंगु व शेळपटच! परंतु हा समज चुकीचा आहे. अहं-कारामुळें मीच कर्ता अतएव फलभोक्ता असें समजून व पापभया-स्तव अक्रिय बसलेल्या अर्जुनास सरसावण्यास लावण्याचे कामीं भगवंतांनीं जो प्रयोग केला, त्यांत "**मयैवैते** निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्!" याप्रकारें त्याची समजूत पाडून देऊन, त्याजकडून प्रथम या **अहंकारालाच** तर गचांडी देवविली (१८।५८) व त्यामुळें तर तो शेळीचा वाघ झाला! अर्थात्, अहंकारत्यागानें 'शूराचा क्लीब होत नाहीं, उलट क्लीबाचा शूर होतो.

* * * * *

१७६. क्लीबाचा शूर कसा व्हावा, हें वर्म कळलें पाहिजे. तें परमात्मानींच दाखविलें आहे, "मच्चितः सर्व दुर्गाणि **मत्प्रसादा-**त्तरिष्यसि। अथचेत्व**महंकारान्न**श्रोष्यसि, विनंक्ष्यसि," अर्थात् **अहंकार** टाकून तूं मच्चित्त झाल्यास **माझा प्रसाद** तुजवर होऊन तूं दुर्गंहि तरशील. उघडच झालें कीं, निरहंकारानें सकलशक्तिमंत प्रभूचें बळ आपणांस मिळतें, आणि तसें झाल्यावर शिखंडीचा धृष्टद्युम्न होण्यास वेळ किती? पण हें रहस्य शब्दांचे सांगणीनें कळत नाहीं, त्याला सत्समागमच लागतो.

* * * * *

१७७. अ[1]-त्रि व अनसूया[2] जेथें नांदत होती तेथें दत्तपरब्रह्म प्रकट झालें; अर्थात् आम्हांत जोंपर्यंत ईर्ष्या, मत्सर, असूया हीं अखंड नांदत आहेत; व काम, क्रोध, लोभ किंवा सत्त्व, रजस्, तमस् किंवा स्थूल सूक्ष्म, कारण, हीं त्रि म्हणजे तीन सतत उभीं आहेत, तोंपर्यंत त्याचा साक्षात्कार होणें अशक्य आहे!

१७८. सुनीतीचे पोटीं ध्रुव जन्मला व त्याचे निष्ठेला देव पावला, आमचे येथें सुनीतीचेंच अस्तित्व नाहीं, मग ध्रुव ( निश्चयीपणा ) याची प्राप्ति कुठून व्हावी ? देवप्राप्ति तर त्याहीपुढली पायरी !

*　　*　　*　　*

१७९. घरोघर जोडपें निराळें तरी दांपत्यसुख एकच; गुरुशिष्यजोडद्या अनेक झाल्या तरी आत्मानंद एकच.

*　　*　　*　　*

१८०. रोगांची परीक्षा वैद्याला विचारा; चामड्याची परीक्षा चांभाराला विचारा; हिऱ्याची जवाहिऱ्याला विचारा; आम्हांला त्यांत कांहीं कळत नाहीं; म्हणजे प्रत्येक गोष्टींत मत देणें हा त्यांतलि मर्मज्ञानाचा अधिकार आहे, असें सर्व कबूल करितात. पण या तुच्छ वस्तु ज्याचे पासंगालाही धरितां येत नाहींत अशा परमेश्वरा-

---

१ अत्रि म्ह. ज्याचे ठिकाणीं त्रि म्ह. ' तीन ' नाहीत, तो. २ अनसूया म्ह. जिचे मनांत दुसऱ्याची ' असूया ' म्हणजे हेवा नाही ती.

बद्दल ' भवति न भवति ' करण्याचा अधिकार व अक्कल निरक्षरा-पासून तों महापंडितापर्यंत सर्वांसहि सारखीच आहे, असें जीव आपले वर्तनावरून दाखवितात; हें पाहून हंसू येतें ! !

*   *   *   *   *

१८१. सतारीची तीच तार खर्ज देते व तीच पंचम बोलते; तेंच मन विषयकर्दमांत लोळवितें व तेंच मन आत्मसुख भोगवितें.

*   *   *   *   *

१८२. कापसाचा गोळा, त्याचा ओढलेला धागा व धाग्यांचा विणलेला पट, हेंच नातें ब्रह्म, जीव व जगत् यांचे ठिकाणीं आहे.

*   *   *   *   *

१८३. **सत्** ( सत्ता किंवा अस्तित्व ), **चित्** ( ज्ञान ), व **आनंद**; यांत चित् हें तराजूचे कांट्यासारखें मध्यवर्ति असून सत् व आनंद हीं दोहों बांजूंचे पारड्यांत आहेत. व पारड्यांतील पदार्थांचें मान जसें कांट्यावरून समजतें तसें सत्ता व आनंद यांचे महत्व **चित्** म्ह. ज्ञानानें समजतें; त्यावांचून तीं व्यर्थ आहेत.

*   *   *   *

१८४. दूध जितकें खरपूस तापलें जाईल तितकें अधिक घट्ट **विरजतें**; त्याचप्रमाणें संसारतापानें मन जेवढें अधिक तापेल तेवढें तें अधिक घट्ट **विरजेल** ( विरक्त होईल ) हें उघड आहे.

*   *   *   *

१८५. वर्तुलाचा मध्यबिंदु म्हणजे संकुचित वर्तुल व त्याचा

परिघ किंवा तें वर्तुल म्हणजे विस्तारलेला मध्यबिंदुच, हें भूमिती
तील सत्य ज्याला कळतें त्याला पिंडी तें ब्रह्मांडीं ही म्हण किं
पिंडब्रह्मांडाचें ऐक्य कळणें अवघड जाऊं नये.

* * * *

१८६. लौकिकांत म्हण आहे 'जशास तसें भेटे आणि
मनींचा संशय फिटे.' हीच परमार्थांतही सत्य आहे. ईश्वराविषयीं
संशय फिटावयास हवा तर तद्रूप झालें पाहिजे, हें उघड आहे.

१८७. फटिंगाशीं फटिंग झाल्याशिवाय सोय नाहीं हें जसें
खरें आहे, तसेंच अवधूत झाल्याशिवाय (दत्त–) अवधूताचें
दर्शन शक्य नाहीं, हा न्यायच झाला.

१८८. देव जर नामरूपातीत आहे तर भक्तासही नामरूपाचा
अभिमान सोडून वेगळें झालेंच पाहिजे.

* * * *

१८९. लहान मुलांत एक म्हणतो 'मला झारीच पाहिजे,'
दुसरा म्हणतो 'मला गडूच पाहिजे' व तिसरा म्हणतो 'मला
गदाधरच पाहिजे' हें त्यांचें बालिशत्व पाहून जसें जाणत्या मनु-
ष्यास हसूं येतें; त्याचप्रमाणें रामच देव खरा, शिवच खरा, आणि
अंबिकाच खरी असें म्हणणाऱ्या भेदाभिमान्यांचें खऱ्या जाणत्यास
हसूं येतें!

* * * *

१९०. न्याय तेथून एकच. आपलेकडे पाठ करून दूर अंतरावर कोणी मनुष्य चालला असतां आपण त्याचा **नामोच्चार** करून हाक मारिली कीं, तो ती ऐकतांच मुरडून आपलेकडे वळतो असा आपला अनुभव आहे. मग **नामसंकीर्तन** पूर्वक परमेश्वरास हाक मारिली असतां तो पाठमोरा असला तरी संमुख होईल यांत संदेह कशाला ?

१९१. एकादा अनोळखी किंवा फरारी मनुष्य झाला असतां तो शोधून काढणें तर, जो हुशार शिपाई असतो तो म्हणतो 'मला त्याचें **नांव** द्या, बस्स ' आणि त्याचे साह्यानें तो शोधाअंतीं त्याचा पत्ता लावतो. हें जर खरें तर परमेश्वराचें **नांव** आपणास परिचित झाल्यावर तो दडून किती राहणार ?

* * * *

१९२. कस्तुरी खाणाराच्या घर्म-मूत्रांना कस्तूरीचा वास येतो, किंवा कांदा खाणाराचे घर्ममूत्रांना भपकारा उठतो; इतर अधलण मधलण पदार्थांचें कांहींच उमटत नाहीं. त्याचप्रमाणें एक अत्युत्कट पाप किंवा अत्युत्कट पुण्य तावडतोब फळ दाखवितें; इतर क्रियांचें तितक्यास तितकेंच.

* * * *

१९३. मांजराचे डोळ्यांतील बाहुली दिवसाचे निर्मल व पवित्र प्रकाशांत संकोच पावते व रात्रीचे अंधारांत विकसित होते; त्याच

प्रमाणें कुजनांची मति निर्मल व पवित्र अशा सत्कर्माचरणांत संकु। चित होते व कृष्णकर्मांत खुलते.

*　　　*　　　*　　　*

१९४. साळू नामक बिळांत राहणारा एक प्राणी आहे. याचे अंगभर दाभणासारखीं टणक व तशीच तीक्ष्णाग्र पिसें असतात ( पूर्वी धूळपाटीवर अक्षर लिहिण्यास यांचा उपयोग करीत ); पण असलीं शल्यें जो रोमरोमीं सुखानें धारण करितो त्याच प्राण्याचे त्वचेला बाहेरून एक टांचणी एवढें कसलें कुसुं लागूं द्या कीं तो अस्वस्थ होतो ! याचें कारण, तीं शल्यें स्वाभाविक आहेत व हें कुसुं आगंतुक आहे. याचप्रमाणें मनुष्य सहस्र वर्षें उदंड सुखांत लोळत असला तरी त्याला उबग येत नाहीं; पण नखाएवढें दुःख एक क्षणभर आलें तरीही तो कासाविस होतो. याचे कारण, असें आहे कीं, सुखरूपता हा जीवाचा मूळस्वभावच आहे, आणि दुःख हें केवळ आगंतुक व परकीं आहे, आणि म्हणूनच तें त्याला खपत नाहीं. ज्याप्रमाणें एखादे बाईला स्वतःचीं खंडीभर पोरें असलीं तरी जड वाटत नाहींत; पण एक पाहुणा पडला कीं जोजार होतो.

१९५. अर्थात् सुख हें मूळरूप आहे व दुःख हें उपरें आहे; आणि म्हणूनच तें हकलून लावितां येणें शक्य आहे ! हें जर मूळघरचें असतें, तर हुसकून देववतेंना.

*　　　*　　　*　　　*

१९६. जें सुग्रास अन्न माफक खाल्ल्यानें अंतरात्मा तृप्त व प्रसन्न होतो, तेंच अतिरिक्त प्रमाणांत खाल्ल्यानें पोटाला कसण्या लागून प्राणही गेल्याचीं अघाशांचीं उदाहरणें आहेत. अर्थात् सुखाचाच बिघड होऊन दुःख बनलें.

१९७. व्यवहारांत दहींदुध हे शब्द अगदीं जोडीनें वापरतात व त्यावरून सामान्यतः असें वाटतें कीं, हे दोन्ही पदार्थ एकाच अधिकाराचे आहेत. परंतु, विचार करील त्याला असें दिसून येईल कीं, त्यांतील एक यजमान असून दुसरा त्याचा आश्रित किंवा उपजीवी आहे. किंवा एक गर्भश्रीमंत आहे, दुसरा दत्तक आहे; एक स्वयंसिद्ध आहे, दुसरा कृतक आहे. सृष्टींत दूध हा पदार्थ स्वभावतः पैदा होतो. दहीं तसा होत नाहीं. दूध बिघडल्यानें किंवा कृतीनें नासविल्यानें दहीं निर्माण होतें. याचप्रमाणें सुखाचा बिघाड झाल्यानें दुःख निर्माण होतें. किंबहुना नासलेल्या किंवा बिघडलेल्या सुखालाच दुःख ही एक व्यवहाराचे सोईकरितां निराळी संज्ञा दिली आहे!! म्हणजे तें एक सुखाचें विकृतरूप आहे.

१९८. कोणी म्हणेल सुखदुःखाची ही मीमांसा कबूल; पण ही कळून फायदा काय?—फायदा मोठा आहे. जो सिद्ध पदार्थ आहे तो नाहींसा कारितां येणार नाहीं, परंतु जो कृत्रिम आहे तो बंद पाडतां येईल. दूध हें बर्फांत ठेविल्यास नासल्यावांचून पूर्व

रूपांत राहतें. अर्थात् जो कृत्रिम किंवा आगंतुक धर्म आहे तो परिहार्य असतो. जो स्वयंसिद्ध आहे तो अनिवार्य आहे.

१९९. याचप्रमाणें सुख हें स्वयंभू असल्यानें अनिवार्य आहे पण दुःख हें आगंतुक असल्यानें त्याला गचांडी देणें शक्य आहे; सुख ही प्रकृति आहे व दुःख ही विकृति आहे; ज्याप्रमाणें दुग्ध ही प्रकृति आहे व दहीं हीं त्या दुग्धाची विकृति आहे. आणि अश्विनीकुमार आला तरी कोणाही रोग्याची प्रकृति बदलूं घजत नाहीं, मात्र विकृति दूर करण्याचा यत्न कारितो. रोग्याचीही मनीषा विकृति दूर सारण्याविषयींच असते; प्रकृति दूर करण्याविषयीं नसते हें सुप्रसिद्धच आहे.

२००. मानवी पुरुषाचे शरीराला स्वभावतः नऊ छिद्रें असतात, व प्रत्येक हाताला किंवा पायाला पांच पांच बोटें असतात हें प्रसिद्धच आहे. या ऐवजीं एकाद्याचे शरीराला भगेंद्र किंवा व्रण होऊन दहा छिद्रें पडलीं किंवा सहा बोटें आलीं तर त्याला दुःख होतें. वास्तविक भगेंद्र तरी छिद्रच, नासाकर्णादिकांचीं तरी छिद्रेंच; पण एक स्वाभाविक व एक आगंतुक किंवा एक प्रकृति व एक विकृति; म्हणून एक सुखदायक व एक दुःखदायक.

२०१. वैद्यशास्त्रावरून पाहतां निरामय स्थितींत असणाऱ्या प्रत्येक मनुष्याचे रक्तांतील स्वाभाविक उष्णता ९८--६ असते. पण या उष्णतेची अशास्त्रज्ञांना तर नुसती कल्पनाहि नसते. मग

तिजपासून त्रास होणें तर दूरच राहिलें. पण ९८–६ याचे ठिकाणीं १०० किंवा नव्याणव होऊं द्या कीं, तो मनुष्य उलथा पालथा होऊं लागतो व त्याचे घरांतीलही घाबरतात. याचें कारण, पहिलें उष्णतेचें मान सहज किंवा प्राकृतिक म्हणून सुखावह आहे. व पुढील अर्धाच अंश पण तो आगंतुक किंवा वैकारिक म्हणून दुःख रूप भासतो. एरव्ही, उभयत्र उष्णतेचाच खेळ आहे.

२०२. याचप्रमाणें सुख व दुःख या उभयही वेदनाच आहेत. परंतु एक ( सुख ) जीवाची प्रकृति आहे म्हणून ती त्यास प्रिय आहे व दुसरी (दुःख) विकृति आहे, अतएव ती त्यास असह्य व अप्रिय आहे. यांत जीवाचा दोष कांहीं नाहीं.

२०३. आतां या जगतांत घरच्याप्रमाणेंच आगंतुकाचाही आदर करणारीं अशीं कांहीं उदार माणसें आढळतात, त्याचप्रमाणें सुख व दुःख हीं एकाच योग्यतेनें लेखणारे महात्मे आढळतात! एकादा तरुण आपल्या कांतेचे मृणालकोमल बाहू ज्या प्रेमानें आपल्या कंठाभोंवतीं पांघरतो तितक्याच आदरानें समर्थ रामदासांनीं हिमज्वरानें थडथडणारी घोंगडी गळ्याभोंवती घेतली! आणि " सुखदुःखे समे कृत्वा " ही बोली तरी अशांचीच; आम्हां पामरांची नव्हे.

२०४. घरचा आणि आगंतुक समानदृष्टीनें वागवूं शकेल तो थोरच खरा. आणि त्याचा वर्गच वेगळा समजला पाहिजे. परंतु,

हें ज्यांचे अंगीं नसेल अशांनीं आगंतुकाला मज्जाव केली म्हणून कायदा त्यांचे आड येत नाहीं. त्याप्रमाणें दुःखाचा प्रतीकार कोणी करील तर त्याला मनाई नाहीं.

२०५. पण घरच्याला कोणी उपाशीं मारील तर धर्मशास्त्र त्याच्या उलट उठेल! त्याचप्रमाणें सुखाच्या कोणी आड येऊं लागल्यास प्रकृति त्याचे विरुद्ध उठते. हा अनुभव सर्वांस आहे व यांतील रहस्य हेंच कीं, सुख तें घरचें व दुःख हें आगंतुक. म्हणूनच आगंतुकाला फिरवल्याबद्दल रागास येणारा यजमान थोडा; तसा दुःख दूर घालविलें असतां नाराज होणारा मनुष्य विरळा; उलट बरी गेली कटकट म्हणून आनंद मानणारेच पुष्कळ.

२०६. परमकारुणिक परमात्मानें सुखाचे अंगीं सहजत्व ठेविलें आहे, इतकेंच नव्हे तर रबरासारखें स्थितिस्थापकत्वहि ठेविलें आहे. रबर जसा जोरानें ताणिला जातो, परंतु ताण दूर होतांच मूळ रूपाला येतो; त्याचप्रमाणें सुख हें कारणपरत्वें विकृत होतें परंतु विकृतीचा प्रतिकार होतांच मूळरूपानें उभें राहतें. हेंच शरीर अनेक वेळां ज्वरादिकांनीं संतप्त होतें, परंतु ज्वरादि दूर होतांच पहिल्याप्रमाणें होतें.

२०७. सुखाचे अंगींही रबरासारखी स्थितिस्थापकता नसती तर-मात्र जीवांचे हाल कुत्रा खाताना, व शास्त्रेंही पुढें तोंड काढतींना.

२०८. आपल्या अंगुलीचें मांस क्षत होऊन सडलें असतां तेंच

जर कायमचें सडेल तर मलम देण्यास कोणी वैद्य धजणार नाहीं. परंतु त्याला माहीत आहे कीं, प्रकृती ही आंतून ताजे रक्ताचा पुरवठा करून नवें मांस उत्पन्न करण्याला सदा सिद्ध आहे. आपण फक्त तिचे मार्गांतली अडचण दूर करावयाची आणि ती हीच कीं, भाग अधिकाधिक सडूं द्यावयाचा नाहीं. तसेंच सांख्यादि शास्त्रकार पक्कें जाणतात कीं, सुख हें सहज सिद्ध आहे आणि दुःख हा केवळ त्याचा बिघाड आहे, तेव्हां तो उपायांनीं दूर करितां किंवा थांबवितां येईल; आणि म्हणूनच ते उपाय सुचविण्याचे भरीस पडतात.

२०९. दयाळू सरकारानें कांहीं घराण्यांना सरंजाम जहागिरी दिल्या आहेत. त्यांचा त्या घराण्यांना भोगवटा घेण्याचा अधिकार पूर्ण आहे; परंतु त्या विकून नाहींशा करण्याचा अधिकार नाहीं, अशी मेख मारून ठेविली आहे. यामुळें प्रसंगीं एखाद्या पिढीला कर्ता गचाळ निघून मिळकतीवर कर्जाचा बोजा चढविला असतां सरकार ती मिळकत आपले देखरेखेखालीं घेऊन कर्जमुक्त करून पुनरपि या घराण्याकडे देतें; म्हणूनच असल्या मिळकतीचा फार मान आहे. त्याचप्रमाणें प्रकृती नेहमीं आपणांस सहाय्य करीत असते.

२१०. या जगांत " सुख पाहतां जवापाडें दुःख पर्वताएवढें " असें जरी कोणाचे वांट्यास आलें असलें तरी सुखाची स्थितिस्था-

पकता व दुःखाची प्रतिकार्यता किंवा परिहार्यता ही लक्षांत आली म्हणजे कोणालाही नाउमेद होण्याचें कारण उरत नाहीं.

२११. कवीनें म्हटलें आहे, 'गुर्वपिविरहदुःखं आशाबंधः साहयति' कीं, एकादे तरुणीचा वल्लभ जरी दूर गेला असला, अगदीं षण्मासाचे कैदेंत पडला असला, तरी तो अमुक तारखेला मुकरर सुटून आपणाला भेटेल इतका निश्चय असला म्हणजे तेवढ्या दमावर ती विरह बहुतेक विसरते. इतकें आशेंत सामर्थ्य आहे. आणि याचकरितां जरी जीवांना प्रासंगिक दुःख असलें तरी तें शाश्वत नसून अपनेय आहे, एवढें सत्य समजल्यास त्यानें तें दुःख किती तरी हलकावेल.

२१२. एतावता जहागिरी—उत्पन्नाप्रमाणें सुख हें फार झालें तर ग्रस्त होईल, पण मुळांतून नाहींसें होणार नाहीं. व दुःख हें कर्जाप्रमाणें घराण्यांत घुसलें असलें तरी कर्ता पुरुष निघाला असतां त्याचें बिऱ्हाड उठवून आपलें घर मोकळें करील, अशी तजवीज ज्यानें ठेविली आहे त्याचे उपकार किती मानावे ! खरोखर आम्हांला तर या गृहस्थाचें स्मरण होतांच 'काय द्यावें यासि व्हावें उतराई' असें होऊन जातें !

२१३. 'इमर्सन' नामक एक अमेरिकन ग्रंथकार आपल्या 'सौन्दर्य' या विषयावरील निबंधांत म्हणतो कीं, 'परमेश्वरानें मानव जातींतील जें मूळ स्त्रीपुरुषाचें जोडपें निर्माण केलें तें रूपानें

रतिमदनासारखें मोहक व शरीरप्रकृतीनें धुतल्या मोत्यासारखें निर्मळ असें केलें होतें. ' आणि हाच नमुना आजपर्यंत कायम चालू राहता. परंतु मनुष्यांनीं आपल्या मूर्खपणानें बिघाड करून टाकिला आणि म्हणूनच असलीं नकटीं फेंफटीं, वेडीं वांकडीं, लुंगीं सुंगीं, कुलुंगी अशीं माणसें निपजूं लागलीं. यांत देवाकडे कांहीं दोष नाहीं. देवाचा हेतु व कायदा प्रथम दंपत्याचे उत्पत्ती समयीं जो होता तोच आज आहे; पण तो समजून घेणारीं व पाळणारीं जोडपींच विरळ, याला देवानें काय करावें ?

२१४. याचप्रमाणें देवानें मूळ मनुष्याला सुखरूपच निर्माण केलें. परंतु मनुष्यानें आपले मूर्खत्वानें व दुष्कृतीनें हें सुख नासवून दुःख हा पदार्थ तयार केला व उलट देवावरच फिर्याद करीत उठतो. या साहसास काय म्हणावें ? जो कोणी प्रांजल व शोधकबुद्धीनें मानवी दुःखराशीची तपासणी करील त्याला निःसंशय असें आढळून येईल कीं, मानवी दुःखांपैकीं शेंकडा पंचाण्णव दुःखें, साक्षात् किंवा परंपरेनें, मानवी दोषांनींच उत्पन्न झालीं. डाक्तर विश्रामजी यांनीं सांगितलें कीं, ' एका पुरुषानें परद्वार केलें असल्यास त्याचे दूषित रक्ताची छटा पुढील सहा सात पिढ्या कोणानाकोणा रूपानें बाधक होते.'

२१५. बटाटा, केळीचा कांदा किंवा अन्य एकादा कंद भुईत पुरला असतां कांहीं कालानें तो सडून नासून जाऊन अगदीं पुळ-

पुळीत होतो. तथापि, ज्या ठिकाणीं अंकुर फुटावयाचा तेथील ' डोळा ' जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत मालकाचे पिकाला धक्का नाहीं. त्याचप्रमाणें, अनेक कारणांनीं जरी सुखाची इतकी नासाडी होऊन गेली असली तरी बुद्धीचा अंकुर जर निरोगी असेल तर सुखाचे पिकाला दगा बसणार नाहीं. म्हणून दुःखी मनुष्यांनीं आपली बुद्धि तरी निरोगी ठेवण्याची तजवीज करावी !

२१६. किंवा कर्जबाजारी जहागीरदार ज्याप्रमाणें कर्जमुक्त होण्यासाठीं आपली जहागीर समर्थ व दयाळू सरकाराचे देखरेखी खालीं ठेवितो, त्याप्रमाणें दुःखी जीवानें आपलें वर्तन कृपाळू संत-समर्थांचे देखरेखीखालीं ठेवावें म्हणजे तो अल्पकालांतच दुःख-मुक्त होऊन मूळचे सुखस्वरूपाला लाभेल.

२१७. सुख ही जीवाची मूळ स्थिति आहे हें आपल्या नेह-मींचे बोलण्यांतही सिद्ध आहे, पण आपण तपासून पहात नाहीं. कोणी म्हणतो " कां हो नाना आतांशीं असे कां दिसतां ! " नाना उत्तर करितात " थोडेंसें बस्तान बिघडलें आहे, प्रकृतीला **स्वस्थता** नाहीं. आतां " स्वस्थता " या शब्दाचा अर्थ काय ? तर स्व म्ह० आपले ठिकाणीं किंवा ' मूळरूपांत ' असणें. दुसरा कोणी म्हणतो, ' गोविंदरावांचें काय ? कोणाचें एक नाहीं दोन नाहीं; **स्वस्थ** सुखांत असतात. ' अर्थात् सुखांत असणें म्हणजेच **स्वस्थ** किंवा **स्वरूपाचे ठिकाणीं असणें. आणि स्वस्थ असणें म्हणजेच**

सुखी असणें, असें आपण व्यवहारांत बोलून दाखवितों. मात्र बोलण्याचा अर्थ उमजत नाहीं.

२१८. सर्वपितरी अमावास्येचा काळोख म्हणजे निबिड, हें प्रसिद्ध आहे. तरी अशा काळोखांत गाडीचे बैल खुशाल वाटेनें चालत असतात. आपण घरांत दिवे मालवून अंधार गुडूप करून निजतों; तथापि, मनूमावशी मामांची शिकार अगदीं तत्परतेनें करीत असते! आतां रात्रीं काळोख आहे म्हणावा तर बैल, मांजर इत्यादि चतुष्पादांस दिवसासारखें झक दिसतें, हें वरील दृष्टांतानें उघड झालें. तेव्हां देवाच्या सृष्टींत काळोख नसून, माणसाला काळोख आहे. तसें म्हटलें तर दिवांधाला (घुबडाला) भर सूर्य तपत असतां ठार अंधार आहे. तेव्हां सिद्धांत काय करावा? सिद्धांत हाच कीं, देवाचे सृष्टींत सर्वदा उजेडच आहे. अंधकार ही वस्तूच नाहीं. म्हणूनच तार्किकांनीं 'तमाची' व्याख्या "प्रौढप्रकाशकतेजःसामान्यऽभावः" अशी अभावरूप केली. म्हणजे प्रकाशक तेजाचा अभाव हेंच तम. त्याचप्रमाणें सुखाचा कारणपरत्वें प्राप्त झालेला अभाव हेंच दुःख. दुःख म्हणून स्वतंत्र पदार्थ नाहीं.

२१९. ही स्थिति दुःखितांस आशाजनक आहे. पावसाळीं नदीला लोंढा आला म्हणजे तीरांतले लवाळे दीन होऊन त्या वेगापुढें माना टाकितात व मोठाच लोंढा आला असतां आंत

बुडून जाऊन तटस्थाला दिसेनासे देखील होतात. परंतु, तो पूर ओसरतांच पुनः माना सांवरून पूर्ववत् झुलत उभे राहतात. कारण त्यांचें मूळ भूमींत पक्कें असतें. याचप्रमाणें हा जीव दुःखपूरांतही सांपडला असला तरी त्याचें मूळ मुळांत भक्कम रोवलेलें आहे, किंबहुना सुखरूपच आहे, याकरितां तो पुनरपि सुखी होईल हा धीर ठेवावा.

* * * *

२२०. देव म्हणा परब्रह्म म्हणा “ अनिर्देश्य आहे, अनिर्वचनीय आहे, वाङ्मनोऽतीत आहे, ” असें कोणी वेदान्ती बोलला कीं नास्तिक किंवा धाधांती लोक त्याचा मनांत तरी उपहास करितात व म्हणतात कीं “ बोंब ! सगळी लुच्चेगिरी, सगळें थोतांड; ‘ आहे ’ तर मग तें दाखवितां कां येत नाहीं ? पण हे निंदक इकडे लक्ष पुरवीत नाहींत कीं तोच वेदान्ती तोच देव किंवा ब्रह्म “ **स्वसंवेद्य** ” आहे असें सांगतो ! म्हणजे ‘ तुझें तुलाच कळून येणारें आहे, ’ असें सांगतो ! अर्थात् ‘ समक्ष तूझी तूंच गांठ घे, माझे हवाल्यावर विश्वासण्याचें कारण नाहीं,’ असें जर तो सांगतो तर तो लुच्चा कसा ? लुच्चाचे कृतींत लपंडाव असतो, सच्चाची भाषा उघडी असते. तो जर ‘ तूंच पाहून घे ’ म्हणून सांगतो तर यांत फसवेगिरी कुठेशी आहे ?

२२१. तुम्हांला हरिद्वारीं जाणें आहे. तुमचा एक विश्वासु

स्नेही जाऊन आलेला आहे. तो तुम्हांला फार तर मार्गाची व त्या स्थलाची कच्ची माहिती सांगेल व शिकस्त तर या स्थळाचें चित्र त्याजपाशीं असल्यास दाखवील. याही पलीकडे साह्य करणें तर तुम्हांबरोबर सोबतीला येईल. पण इतकें केलें तरी तुम्ही स्वतः प्रवास केल्यावांचून तुम्ही घरबैठा हरिद्वार पाहूं शकाल हें विधातृ-सृष्टींत शक्य झाले नाहीं व पुढें होणें नाहीं. मग असल्या स्नेहाची टवाळी जर तुम्ही करीत नाहीं, तर वेदांताची किंवा वेदांत्याची तरी कां करावी? तेही तुम्हांला वस्तूचें वर्णन किंवा शब्दचित्र देतात आणि मार्ग दाखवितात. यापलीकडे कोणी झाला म्हणून काय करूं शकेल?

२२२. आतां वस्तूचें वर्णन हें वस्तूचे स्वरूपावर अवलंबून आहे. नवरी करायला फुरफुरलेल्या एकाद्या बिजवरानें दोन ठिकाणीं मुली पाहण्यासाठीं आपले स्नेही पाठविले. एक सांगत आला कीं, मुलगी काय 'चंद्रप्रभा आहे' व दुसरा म्हणाला 'आमावास्या' आहे. तर यांत चंद्रप्रभेचें वृत्त आणणारास 'प्रिय' मानणें व आमावास्येचें' वृत्त आणणारास अप्रिय मानणें हें मूर्खपणाचें व अन्यायाचे होईल. कारण 'वस्तू होती तशी त्यानें वर्णिली.' तेव्हां त्यानें आपली कामगिरी चोख बजाविली. ती वस्तू तुमचे मनाजोगी नसली म्हणून त्या वार्ताहरावर डोळे मोडणें अनुचित आहे.

२२३. ‘ कैलास–मानस–सरोवर–दर्शन ’ हें पुस्तक लिहिणारे गृहस्थ ‘ हंस ’ येथें आले असतां येथील एका गृहस्थानें ‘ आपणासही तेथें जाणें आहे ’ असें म्हणून मोठ्या उत्सुकतेनें त्यांना मार्गाचें वर्णन विचारिलें. परंतु त्या वर्णनांत जेव्हां ते बिकट मार्ग, बर्फाचे वर्षाव, वन्य श्वापदांचे हल्ले, अन्नपाण्याची पंचाईत, चोरांच्या धाडी इत्यादि इत्यादि गोष्टी कानीं आल्या, तेव्हां राजश्रींची हौस जागचे जागींच जिरली ! पण याबद्दल वर्णनकर्त्यावर नाखूष होणें योग्य नव्हे. याचप्रमाणें ब्रह्मसाक्षात्कारासाठीं फुरफुरलेल्या उमेदवाराची खुमखुम त्याचें ‘ कूटस्थ स्वरूप ’ ऐकल्यानें जिरली म्हणून ब्रह्माची किंवा त्याचें माहात्म्य सांगणाराची कुत्सा करणें हा अविचार आहे. वस्तु आहे ती खरी. ‘ लंडन ’ येथून पांच हजार कोस जर आहे, तर तें एकादा राजपुत्र जाणार असला म्हणून पांच कोसांवर थोडेंच आणितां येणें शक्य आहे ! तोच न्याय ब्रह्माचा.

२२४. एखाद्या प्राणिशास्त्रवेत्त्यानें एकादे ‘ सुरवंटाला ’ म्हटलें कीं, तूं ‘ फुलपांखराचाच ’ जातभाई आहेस. सुरवंटानें त्याला म्हटलें कीं, तुम्ही खोटें बोलतां. तर तो प्राणिशास्त्रज्ञ म्हणेल, “ ठीक आहे. तूं माझे हे शब्द ध्यानांत ठेव, आणखी अमुक काळानें मजकडे ये. मग पाहूं खरें कीं खोटें. किंवा तुला इतका धीर नसेल तर हीं फुलपांखरें येथें उडत आहेत यांना विचार,

यांचें पूर्वरूप कसें होतें आणि मग त्यांची साक्ष पटली तर माझें खरें मान." दुसरें तो काय सांगेल! याउपर, तत्क्षणींच आपणास फुलपांखराचें रूप आलें नाहीं म्हणून तो प्राणिशास्त्री लुच्चा असें जर सुरवंट म्हणेल तर त्याचें मूर्खत्व व्यक्त होणार आहे.

२२५. 'अनुभवाची जागा' दुसऱ्या कशानेंही भरून निघणें शक्यच नाहीं. शब्दाचें सामर्थ्य 'अनुभव जागा (जागृत) करणें' एवढेंच आहे. त्याची जागा भरून काढण्याचें नाहीं. नाटककर्ते शब्दाचे कांहींसें पुढें जाऊन शब्दचित्राचे जोडीस वस्तुचित्र उभें करीत असतात. तरी देखील त्यानें अनुभव जागा करण्यापलीकडे कामगिरी करवत नाहीं. समजा कीं, रंगभूमीवर नायकनायिकेंत साभिनय शृंगार चालला आहे. तरी ज्यांनीं कामचेष्टा कधींच अनुभविल्या नाहींत अशा आठ आठ वर्षांच्या मुलामुलींना किंवा एकाद्या तृतीय प्रकृतीला काय रोमांच येणार आहेत? ज्या स्त्री-पुरुषांनीं त्या चेष्टा अनुभविल्या आहेत, तींच थरारतील. अर्थात् हें थरारणें म्हणजे त्यांचा पूर्वानुभव जागृत होणें. ढोरेंगुरें दूर रानांत आंबे खाऊन येतात आणि मग घरीं रोवंथ करून कोई बाहेर टाकितात. पण त्या पाहून गोठ्यांत आंबे होते हें म्हणणें चुकीचें आहे. तसाच त्या अभिनयानें ताजा अनुभव पटला ही भाषा खरी नव्हे. त्यानें केवळ अनुभूत अनुभव जागा झाला हें मात्र खरें.

२२६. 'रामकृष्णपरमहंसांचे वृत्तांतांत असें लिहिलें आहे कीं, त्यांचा प्रिय शिष्य नरेंद्र ऊर्फ **विवेकानंद** दृष्टीस पडून तो भक्तिपर गीत गाऊं लागला कीं, श्रवणाबरोबर परमहंसांचा समाधी लागून ते आत्मरूपीं लीन होत. परमहंसाशिवाय इतर श्रोते तेथें खंडीभर असत; परंतु त्यांपैकीं इतर कोणाचाही समाधि लागला नाहीं. श्रीसद्गुरु नृसिंहसरस्वतीचीही अशीच गोष्ट कीं, आळंदीस ज्ञानोबाचे मंडपांत भजनास उभे राहून 'विठ्ठल विठ्ठल' असें दहापांचदा कानीं पडलें कीं, तत्काळ निर्भान स्थिति होऊन त्यांचा देहभाव नाहींसा होई ! इतर श्रोते तसेच खुंटासारखे उभे असत. आतां नरेंद्राचे गीतांत किंवा विठ्ठल या शब्दांतच जर आत्मानुभव देण्याचें सामर्थ्य असतें तर प्रत्येक नव्या जुन्या श्रोत्याचा समाधि लागता, पण तसें होत नाहीं. ज्या समर्थांना पूर्वाभ्यासानें समाधिसुख अनुभूत असेल त्यांचेच ठिकाणीं तें आविर्भूत होतें. अर्थात्, शब्दांनीं त्यांचा अनुभव जागृत होतो एवढेंच.

२२७. एक आख्यायिका आहे कीं, एक वृद्ध दाढीवाले पुराणिकबोवा पुराण सांगत असतां श्रोत्यांपैकीं एक बाई घळघळ रडे. पुराणिकबोवांना वाटे कीं, आपली वाणी इतकी हृदयद्रावक आहे व ही बाईही विशेषच भाविक आहे. तेव्हां असल्या भाविक श्रोत्याबद्दल पुराणिकबोवांना आस्था व कौतुक वाटून त्यांनीं बाईला एकदा एकीकडे प्रेमानें विचारलें कीं, पुराण ऐकून तुमच्या

डाळ्यांना नित्य पाणी येतें, आमचे कसें येत नाहीं? बाईनें उत्तर केले, "बोवासाहेब, माझे डोळ्यांस पाणी येण्याचें कारण असें आहे कीं माझा एक वृद्ध व लांब दाढीचा लाडका बोकड होता तो चारा खाऊं लागला कीं त्याची दाढी हाले; तो नुकताच मेला. आपण पुराण सांगूं लागला म्हणजे आपली दाढी हालूं लागली कीं, मला त्या प्रिय बोकडाचें स्मरण होऊन रडें कोसळतें, दुसरें काय?

या आख्यायिकेवरून पाहतां व्यासमूर्ति पुराणिकांची दाढी पाहून त्या बाईचा प्रिय पशूचे दाढीचा अनुभव जागा झाला! पूज्य ब्राह्मण पुढें असतांही क्षुद्रपशूचा अनुभव तिच्यापुढें उभा राहिला, याचा अर्थ काय?

२२८. कै. श्री. सौ. वाराणशीबाईसाहेब होळकर ( कै. शिवाजीराव होळकर यांच्या पट्टराणी ) म्हणाल्या 'आम्ही थोरले महाराजांचे ( तुकोजीराव होळकरांचे ) बरोबर एकदां फौजफांटा वगैरे सर्व लवाजम्यासहित होळकरांचें दक्षिणेंतील मूळ गांव जें 'होळ' तिकडे चाललों. वाटेंत मी हत्तीवर बसून जात असतां, एका खेड्यांतल्या कुणब्याच्या लहान लहान मुली मौज पहावयास आल्या व माझा हत्ती पाहून एकमेकींत म्हणाल्या 'काय ना बया, कोण म्येला ढेरपोट्या रेडा ह्यो, आणि ह्याला शिंगटेंच न्हाई; आणि पुढें ही लोळी कसली हलवतो.' यांत त्या ग्राम्य

बालिकांचा दोष नाहीं. त्यांना अनुभव टोणग्याचा, तेव्हां साक्षात् गजराज पुढें असूनही टोणग्याचें चित्र त्यांचे डोळ्यांपुढें उभें राहिलें. प्रत्यक्ष वस्तु पुढें असतांही पूर्वानुभवाची जर ही जबरदस्ती आहे, तर नुसत्या शब्दांनीं नूतन अनुभव पैदा होणें, किंवा अनंत जन्मींचे देहात्मबुद्धीचे संस्कार तत्काळ नष्ट होणें, हें कसें घडावें? हें, 'शब्द पोंचट आहेत. आणि वेदांती वाचाळ ठक आहेत' हें म्हणणारांनीं आपल्याशीं विवरावें.

२२९. यावर कोणीं उलट सवाल करील कीं, 'शब्द जर प्रत्यायक नाहींत किंवा नवा अनुभव आणून देत नाहींत, तर ते फोल आहेत. मग त्यांचा श्रुतिस्मृतिपुराणांनीं इतका बाजार कशाला भरला आहे. हे गुरुपदेश वगैरे काय थोतांड आहे?' तर असें नव्हे. शब्द किंवा उपदेश निष्प्रयोजन नाहींत, तेही कामगिरी करतात. शब्द किंवा उपदेश जरी स्वतः अनुभवाची जागा भरून काढीत नसला तरी अनुभवाचे दरवाज्याशीं तरी अचूक नेतो. ही कामगिरी कांहीं थोडी नव्हे. हंसानें दमयंतीचें शब्दचित्र नळराजापुढें मांडिलें, व नळाचें दमयंतीपुढें मांडिलें. अर्थात् तेवढ्यानें त्या स्त्रीपुरुषांचें काम झालें नाहीं, पण परस्पर संगमाची उत्कृष्ट इच्छा जागृत करून परस्परप्राप्यर्थ बिनकसर यत्न करण्याची प्रवृत्ती त्या शब्दांनींच त्यांचे ठायीं उत्पन्न केली आणि त्या यत्नाचेंच फळ अन्योन्यसंगम हें झालें. ही गोष्ट हलकी नव्हे.

म्हणजे शब्द हा स्वयमेव अनुभव नसला तरी अनुभवाची जननी आहे.

२३०. एखादे वृद्ध म्हातारीचा पुत्र मोठा पराक्रमी व लोकमान्य निघाला कीं जो सिंहासनारूढ झाला, तर आपल्या लोकांचे चालीप्रमाणें ती म्हातारी त्या सिंहासनावर बसूं शकली नाहीं, तरी सिंहासनावर बसणारा तिचा पुत्र तिला प्रथम वंदन करून येऊन मग प्रसिद्धपणें सिंहासनावर बसतो, व इतर लोकही महाराजांची माता या भावनेनें तिचे नामश्रवणाबरोबर सादर होतात. याच प्रमाणें शब्द जरी अनुभवाचे आसनावर चढला नाहीं तरी अनुभवांचे जननीत्व त्याजकडे असल्यामुळें अनुभव त्याच्यापुढें माथा वांकवितो; व त्याच कारणामुळें जनताही त्याला मान देते.

२३१. 'नाट्यकथार्णवकर्ते' ( कै. शंकर मोरो रानडे ) हे मी जन्मांत पाहिले नव्हते, परंतु ते मुंबईस असतात व अट्टल बिडीबाज आहेत एवढें ऐकिलेलें होतें. एकदां दुपारची सुटी संपून शाळेला परतत असतां मोरोबादादा फडनिसांचे वाड्याचे डावे बाजूचे जिन्याचे पायऱ्यांशीं एक गृहस्थ डोकीला मुंबई तऱ्हेचें पागोटें घातलेला आणि विड्यांची जुडगीं खरेदी करितांना दिसला, त्याबरोबर मला वाटलें कीं शंकर मोरो म्हणतात तेच हे असतील. पुढें आम्ही आंत जाऊन वर्गांत बसत आहों तों तेच गृहस्थ आमचा वर्ग ( इंग्रजी पांचवी ) घेण्यास आले. आणि

ते शंकर मोरोच होते असें वर्गांतील कित्येक मुलगे म्हणाले. त्यामुळें मला आनंद झाला. असाही उपयोग कधीं कधीं शब्दाचा होतो.

२३२. अनुभवाची जागा उपदेश हा भरून काढीत नाहीं असें वर सांगितलेंच आहे. मग उपदेशाचें महत्व काय व कामगिरी काय ? असें कोणी म्हणेल तर, अनुभवी मनुष्याचे तोंडचा उपदेश हा उप म्हणजे **सन्निध** किंवा जवळचा, देश म्हणजे **स्थळ** किंवा प्रांत येथें नेऊन सोडितो ! ज्याप्रमाणें एखाद्या सद्यःप्राप्त–यौवनेला तिची आनुभविक प्रौढ सखी आपलें स्वानुभवाचें स्वरूप सांगून तिला पतिसमागमाचा जो बागुलबोवा वाटत असतो तो उडवून तिला धैर्य देऊन चुचकारून पतीच्या शय्यागाराचे द्वारापर्यंत पोंचविते, पुढील एकांतांतील अनुभव त्या तरुणीनें स्वतःच पुरुषापासून पैदा करावयाचा असतो ! याचप्रमाणें श्रुतिमाता जीवास उपदेशानें चुचकारून पुरुषोत्तमाशीं एकांत करण्याविषयीं उद्युक्त करून सोडिते, पुढील अनुभव त्या ( **परम** ) **पुरुषाचे** कृपेनेंच ज्याचा त्यालाच प्राप्त होतो ! !

२३३. ‘ **अनुभव** ’ हा ज्याचा त्याचा. त्याची जागा इतर कशानेंही भरून निघत नाहीं. याचा दोष कोणाकडेच नाहीं. अनुभवाचें स्वरूपच तसें द्व्याड आहे, त्याला इतरांनीं काय करावें ? कारण ‘ अनुकरण ’ या शब्दाचा अर्थ “ अनु ” म्हणजे “पश्चात्” किंवा “ तत्सदृश, ” कारण म्हणजे “ करणें ” असा होतो;

त्याचप्रमाणें " अनुभव " या शब्दाचाही यौगिक अर्थ "अनु" म्हणजे " तत्सदृश " ' भव ' म्हणजे " होणें. " असा असल्यानें, हें ज्याचें त्यानें स्वतःच व्हावें लागतें. जसें सुरवंटाचें फुलपांखरूं होणें हें त्याच शरीराचें रूपांतर होणें असल्यामुळें सुरवंटाचा स्वतःचा देह पालटल्याशिवाय गत्यंतर नाहीं, त्याचप्रमाणें ज्याला मिळून कोणत्याही गोष्टीचा अनुभव घेणें त्याला तद्रूप बनतां आल्याशिवाय ती स्थिति वस्तुस्वभावानेंच अशक्य आहे आणि यामुळें " अनु-भव " म्हणजे ' तद्रूप ' ता घेणें ही अनन्यसाध्य गोष्ट आहे, हें सिद्ध झालें.

२३४. यावरून पाहतां कोणत्याही गोष्टीचा "तूं अनुभव घे" म्हणून सांगणें याचा अर्थ " तूं तद्रूप हो " हा समजावा. कांहीं लोक जो त्याचा वरवर अर्थ समजतात कीं, " तूं वेगळा राहून त्याची चाखणी घे " तो अर्थ खरा नव्हे. आणि गैर समजामुळेंच पुष्कळ विपत्ती उत्पन्न होते. यास्तव प्रथम शब्दज्ञानच सम्यक् करून घ्यावें.

*　　*　　*　　*

२३५. ही गोष्ट प्रत्येक विचारी मनुष्य कबूल करील कीं, आपण जन्मास येऊन कोणतेंही अक्षर किंवा शब्द एकवार शिकतों. उदाहरणार्थ, " ये " हें अक्षर किंवा शब्द. हा एकवार आपण शिकतों. आणि मग हा शब्द आपण आमरण सहस्रावधि वेळां

उच्चारितों व तो आपलें कार्यही करितो. अर्थात् स्थूल वस्तूंचे भाषेप्रमाणें म्हणणें म्हणजे तो शब्द आपण खर्ची घालतो; घालीत नाहीं म्हणावें तर त्यानें आपलें प्रत्यक्ष कार्य केलें आहे. हजारों वेळां इच्छित वस्तु आपले सन्निध आणूनही दिली आहे. बरें, खर्ची घातला म्हणावें तर आपले जवळ तो नाहींसा किंवा "कमी" झाला नाहीं. या जन्माला पुरून कदाचित् पुढील जन्मालाही कायम राहील इतका तो ठाम आहे. याचप्रमाणें जगद्रूप कार्य करूनही ब्रह्म कमी न होतां ठिकाणीं अपरिणत कायम आहे, असें कोणी म्हटल्यास खोटें कां वाटावें ?

*　　　*　　　*　　　*

२३६. सांगतात कीं, 'कालिदास' कवीची कीर्ति ऐकून कोणी एक दूरस्थ कवि (धनंजय) त्याची परीक्षा पाहण्याकरितां स्पर्धेनें धारानगरीस यावयास निघाला. नगरोपांतीं येत आहे तों त्याला एक मुलगी (भिस्त्याची) भेटली. तिला त्यानें विचारिलें, 'बाले, तूं कोण ?' त्याबरोबर तिनें उत्तर केलें:—

"चतुर्मुखो नच ब्रह्मा वृषारूढो न शंकरः"

"अकाले वर्षते मेघस्तस्याहं कुलबालिका"

हें उत्तर ऐकतांच कवि चपापून जाऊन हतगर्व झाला व आपल्याशीं म्हणाला "कालिदासाची जेथें वस्ति तेथील भिस्ती, माळी इत्यादिकांच्या मुली जर इतपत काव्यकुशल आहेत, तर

आतां कविकुलगुरूचे सामर्थ्याची कल्पना येथूनच होणार आहे."
याचप्रमाणें ज्यांत आपण अहोरात्र वापरतों अशा जड–भौतिक
शक्तींचाच जर अंतपार आपणांस अजून लागत नाहीं, तर ह्या
भौतिक शक्ति ज्याचे चरणाच्या दासी देखील म्हणवत नाहींत
त्या परमात्म्याचे सामर्थ्याची उंचीखोली कशी कळावी ? आणि
ती कळली नसूनही परमात्मा कोण आणि कशाचा, असलीं विधानें
करणें धाडस नव्हे काय ?

* * * *

२३७. सामाजिक प्रगतीचा इतिहास पाहतां सृष्टींत "घोंगडी"
आधीं निर्माण झाली व " शालजोडी " किती तरी मागाहून
झाली ! यावरून पाहतां परम दयाळु परमेश्वर " गरीबाची "
चिंता प्रथम वाहतो व श्रीमंतांची किंवा श्रीमत्ताची पश्चात् वाहतो,
असें उघड झालें, म्हणूनच त्याला दीनदयाळ, 'गरीबके निवाज'
असें म्हणतात.

* * * *

२३८. माझा एक स्नेही एक दिवस 'विष्णुसहस्रनाम' वाचीत
असतां म्हणाला "माधवराव, तुमचे वडील हें वाचीत, त्यांचें पाहून
आम्हींही वाचीत असतों. आम्हांला याचा अर्थ कांहीं कळत नाहीं.
मग कसें ?" मीं सांगितलें कीं " दामोदरपंत ! हरकत नाहीं.
तुम्हांस कळला नाहीं तरी ज्याला उद्देशून तुम्ही हें म्हणतां त्या सर्वज्ञ

प्रभूला तर कळतोसें तुम्हाला वाटतें ना! मग तुमचें कार्य झालें. तिसरें बुकांतील त्या ( बोलणाऱ्या ) ढलप्यावरील अक्षरांचा बोध जरी त्या कामकऱ्या हमालाला झाला नाहीं. तरी जिच्याकडे तो ढलपा पाठविला तिला त्याचा बोध असल्यामुळें पाठविणाराचे हातीं गुण्या आला. त्याप्रमाणेंच हें समजा." तेव्हां त्या गृहस्थाचें समाधान झालें.

२३९. दुसरे एका गृहस्थानें असाच प्रश्न केला असतां मी म्हटलें:—"आजकाल आपल्या देशाचे इंग्रज हे प्रभू आहेत. आणि म्हणून आपणांपैकीं पुष्कळजण इंग्रजी भाषा शिकतात हें खरें, व ती शिकल्यानें अनेक फायदे होतात हें खरें. परंतु प्रजाजनानीं राजकर्त्यांची भाषा शिकलीच पाहिजे अशी कुठें सक्ती नाहीं, मात्र प्रजेनें कशाही स्वभाषेंत अर्जी केली असतां राजकर्त्यांनीं ती समजून घेतलीच पाहिजे; भाषेचे अज्ञानाचे सबबीवर ती अर्जी नाकारतील तर चालावयाचें नाहीं असें आहे. याप्रमाणें भाविक भक्त कसलीही अडाणी भाषा बोलो, तिचा अर्थ समजून घेणें हें प्रभूला भाग आहे! त्यावांचून त्याला गति नाहीं. तेव्हां देवपणच कठीण आहे. भक्तपणाला सवलत मुबलक आहे, 'वेडेंवाकुडें गाईन। दास तुझा म्हणवीन।' बस्स.

२४०. वैदिक ऋचांचा अर्थ बरा वाईट कसाही असो; वेदमंत्रांनीं किंवा ऋचांनीं केलेली परमेश्वराची स्तुती सर्व प्राकृत स्तुतीपेक्षां अधिक श्रेष्ठ धरली जाण्याचें कारण असें आहे: एखाद्या

बाईला तिच्या स्वतःचें पोटचें शेंबडेंही पोर पाहून जो पान्हा फुटेल तो दुसऱ्याचें कसलेंही मोहक बचडें ठेविलें तरी फुटणार नाहीं. याचप्रमाणें वैदिक-स्तुति ही प्रत्यक्ष ईश्वराचीच वाणी असल्यामुळें तिनें जी त्याची प्रसन्नता होईल तितकी इतर वाणीनें सहसा होणार नाहीं.

२४१. दुसरें, एकादा न्यायाधीश कसलाही द्वाड असला तरी त्यानेंच पूर्वीं दुसऱ्या खटल्यांत लिहून दिलेल्या नियमाचा आधार पुढें टाकिला म्हणजे तो वळणावर येतो. आणि परमेश्वर तर मूळच सरळ आहे. त्याला त्याचेच नियमांचा पुरावा दिल्यावर तो आपल्यासारखा निवाडा देणारच म्हणून श्रुत्युक्त स्तोत्रांची व कर्मांची थोरवी बहुत आहे.

२४२. वेदांत अशाही ऋचा आहेत तशाही आहेत; पण कशाही असल्या तरी त्या ईश्वराला आवडल्याच पाहिजेत. स्वयंपाक्याचा स्वयंपाक इतरांना आवडो न आवडो; तो खारट होवो तुरट होवो, स्वतः आचारी त्याला गोड म्हणून खाणार! हाच न्याय येथें.

२४३. आतां वेद, भवद्गीता इत्यादि जे ईशकृत ग्रंथ आहेत यांचा प्रकार बेलिया वगैरे अत्तरांसारखा आहे. बेलियाची कुपी नुसतीच खोलून सन्निध ठेविली तरी तींतून खुशबु चालून आपल्याला घ्राणतर्पण व आनंद हीं मिळतात. बरें, तेंच अत्तर हातीं

घेऊन अंगास व केशांस चोळलें तरी अंग व केश यांचे ठायीं तो सुवास दीर्घकाल टिकून शिवाय त्यांस मार्दव प्राप्त होतें. त्याचप्रमाणें वरील ग्रंथाचे केवळ पाठानेंही कर्णतर्पण होतें. आणि त्यांच्या अर्थाशीं परिचय झाला, तर मग वृत्तींतही मार्दव व आनंद हीं उमटतात.

*　　*　　*　　*

२४४. दुधांत पाण्यापेक्षां सत्व व बलवर्धकपणा निखालस अधिक आहेत. तथापि ज्याचा उपजनिपज केवळ जलांतच आहे अशा मत्स्याला जलाऐवजीं दुग्धांत टाकिलें असतां त्याचें जीवन कष्टमय होईल! याचप्रमाणें ज्या धर्मांत जो मनुष्य उपजला तो सोडून परधर्मांत ( मग तो कसाही श्रेष्ठ असो ) जाणें भयावह आहे ( स्वधर्मे निधनंश्रेयः परधर्मो भयावहः )

*　　*　　*　　*

२४५. वेदांती लोक ब्रह्माचें वर्णन बहुधा नकाराश्रयानें करीत असतात. अशब्द, अस्पर्श, अरूप, अव्यय, अरस, अस्थूल, अनणु म्ह० ब्रह्म स्थूलही नाहीं, सूक्ष्मही नाहीं वगैरे. तें ऐकून धाधांती मनांत जाजावून म्हणतो, स्थूलही नाहीं, सूक्ष्मही नाहीं, ऱ्हस्वहि नाहीं, दीर्घही नाहीं, मग आहे तरी काय! तुझें डोंबल! तुला कळलेंच नाहीं असें कां म्हणसनां!! जर तें आहे तर त्याचें वर्णन भावार्थक कां करितां येऊं नये? असें असें आहे हें म्हणा-

वयाचें सोडून हा नन्नाचा पाडा कां ? या घावांत्याला असें सांगणें प्राप्त आहे कीं, ब्रह्माचे वर्णनांत अशी उलटी भाषा वापरण्याचें कारण ब्रह्मवेत्त्याचें अज्ञान नसून तुझेंच गाढ अज्ञान किंवा विपरीत पूर्वसंस्कारदार्ढ्य हें कारण आहे. तुला जें कांहीं माहीत आहे, याचेच आधारानें जे माहीत नाहीं किंवा नवीन आहे त्याची माहिती करून देणें प्राप्त आहे. एरव्ही दुसरी तोडच नाहीं. म्हणून श्रुतीला तुझ्यासाठीं या आडवळणांत शिरावें लागलें, आणि याच गोष्टीचा प्रत्यय आजच्या व्यवहारांत देखील आहे.

२४६. श्रुतीचे लांब राहूं दे, अगदीं ताजा ताजा व्यवहारांत येऊं पाहणारा इंग्रजी शब्द ' Wireless Telegraphy ' हा घे. या शब्दाचा सांप्रत मराठी तर्जुमा " **बिनतारी तारायंत्र** " असा सुज्ञ लेखक करितात. आतां गणिताचे भाषेप्रमाणें जर या शब्दाची चिकित्सा केली तर हा शब्द गचाळ नव्हे काय? तारायंत्र म्हणतोस आणि बिन तारेचे म्हणतोस म्हणजे तार आणि बिनतार या दोन पदांचा गणिताप्रमाणें छेद उडविला किंवा परस्पर वजाबाकी केली म्हणजे उरतें काय? तेथें तार जर नाहीं तर मग तारायंत्र म्हणण्यांत चव काय? आमचे मतें हा शब्द ब्रह्मवर्णनाचे शब्दांहूनही एकपरी अक्षम्य आहे. परंतु आजसारख्या शास्त्रीय प्रगतीच्या कालांत अगदीं अग्रेसर शहाणे देखील हा शब्द बेधडक वापरीत आहेत, हे कां सारेच मूर्ख म्हणावे? नव्हे,

ते मूर्ख नव्हेत; पण ते परतंत्र आहेत; रूढिशरण आहेत. कारण आजपर्यंत संदेशवाहनाचें यंत्र म्हणजे तारायंत्र हा शब्द व ही भावना लोकांच्या हाडींमासीं खिळून गेली असल्यामुळें तत्स्थानापन्न जरी नवीन अगदीं विजातीय रीति आरूढ होऊं पहात असली तरी तिला पूर्वीचीचा मान राखून आपलें बिऱ्हाड दिलें पाहिजे; नाहींतर बखेडा माजेल, म्हणून शहाणे सोईनें घेतात. त्याचप्रमाणें तुला जर अनंत जन्म व अनंत पिढ्या शब्द, स्पर्श, ऱ्हस्व, दीर्घ हीच वैषयिक व साकाराचीच भाषा पाठ आहे, तर त्याशीं अत्यंत विसदृश किंवा विजातीय अशा जरी निर्विषय निराकाराची माहिती देणें झालें तरी तुला परिचित असलेल्या भाषेचा आश्रय करून बोलणें हें तुझ्या कल्याणासाठीं श्रुतीला प्राप्त आहे!! सारांश, तुझेसाठीं श्रुतीनें एवढें आडवळण पतकरिलें हें पाहून तिचा आभारी हो. तिची हेळणा करूं नको.

२४७. कोऱ्या कागदावर प्रथमच लिहिणें म्हणजे वाटेल तसें लिहिलें तरी चालतें. परंतु लिहिलेल्या कागदावर लिहिणें म्हणजे पहिल्या अक्षरास संभाळूनच लिहिलें पाहिजे. नाहीं तर चिताड किंवा घोटाळा होईल. महाराष्ट्र ब्राह्मणाचें मुलगें त्याला वाणी फुटण्यापूर्वीच एकाद्या कानडी कुटुंबांत नेऊन ठेविल्यास तें जातकानडी गृहस्थाच्या मुलाइतक्याच सौलभ्यानें कानडी भाषा उचलील. पण तेंच जर प्रथम महाराष्ट्र भाषा पुरापुर शिकल्यावर कानडी भाषा

शिकूं म्हणेल तर त्याला प्रयास फार पडतील. कारण कोणताही कानडी शब्द त्याचे कानीं पडला असतां आपल्या महाराष्ट्रींत याचा समानार्थक शब्द कोणता तो समजून घेण्याचे खटपटींत तें सहजवृत्तीच पडतें. इंग्रजाचे पोरांना इंग्रजी भाषा शिकतांना 'मीनिंग बुकाची' जरूर नसते, पण आम्हांला ती शिकणें म्हणजे मीनिंग बुकाशिवाय घोडें पाऊलच घेत नाहीं. ब्रह्मदेवानें सनक-सनंदन-सनत्कुमार वगैरे मानसपुत्र उत्पन्न केले ते उपजतच तपो-वनांत गेले; कारण त्यांना व्यवहार माहीतच नव्हता; पण पुढें जेव्हां मैथुनसृष्टी निर्माण झाली तेव्हां तींतील प्रजेला मात्र विषय-कर्दमांतून ओढण्यास फार कष्ट पडूं लागले. याच प्रमाणें आम्हा विषयी जीवांना ब्रह्माची भाषा शिकविणें म्हणजे आम्हीं दृढाभ्यस्त जी वैषयिक भाषा तिच्यांतच त्याचा पर्याय दाखवावा, तेव्हां ती आमच्या माथ्यांत उतरणार. असा कांहीं विलक्षण तिंगस्तिंगा झाल्यानें श्रुतीला असली अस्वाभाविक रीति पत्करावी लागते. पण, याबद्दल श्रुतीला दोष न देतां आमचें हेंगाडें वळण आम्हीं दुरुस्त केलें पाहिजे.

२४८. समुद्र हा नदीचा वैकुंठ आहे. अर्थ म्हणजे वस्तु हा शब्दाचा वैकुंठ आहे. आणि अनुभव हा जिज्ञासेचा वैकुंठ आहे—म्हणजे तेथें तिची गति कुंठित होते. नदीची धांव समुद्र भेटला कीं कुंठली—पुढें तिला अवसरच नाहीं. तसेंच शब्दानें प्रतिपादित

वस्तु साक्षात्कृत झाली म्हणजे शब्दाचें प्रयोजन कुंठलें. माझी 'काठी आण' "काठी आण" म्हणून नोकराला ओरडून सांगणारा धनी नोकरानें हातीं काठी नेऊन देतांच आपेंआप गप्प होतो. कारण, शब्दाचें कारण संपलें. वस्तुप्राप्तीच झाली. याचप्रमाणें आत्मसाक्षात्कार झाला म्हणजे शब्द आपेंआपच लंगडे पडतात व अप्रयोजक ठरतात. तसाच कोणत्याही गोष्टीचा अनुभव आला कीं तद्विषयक जिज्ञासा संपते. आणि म्हणून ब्रह्मानुभवी लोक सहजच तृप्त असतात. आणि ब्रह्माला "मौन" अशीं संज्ञा आहे ती याच कारणानें. तेथें शब्द कुंठितच रहातो.

२४९. अनुभवाची सर कशालाही नाहीं. व त्याची बदली कोणालाही साधावयाची नाहीं. कोणी म्हणेल, कां बरें ? मोठमोठ्या गहन ग्रंथांचा अर्थबोध शब्दपर्यायानें म्हणजे शब्दाचे बदलीनें होत नाहीं काय ? होय; होतो; पण तो शब्दसामर्थ्यानें नसून अनुभवसामर्थ्यानें होतो. उदाहरणार्थ, आपण असें कल्पूं कीं एका मुलानें हत्ती कसा असतो हा साक्षात् किंवा चित्रांत देखील पाहिला नाहीं. आणि अशाला एक तद्वाचक 'इभ' हा शब्द ग्रंथांत आला. त्याला पर्याय म्हणून कुंजर, वारण, दंती, दंतावल, गज, नाग, व्याल इत्यादि शब्द परंपराही आपण दिलीं; तरी जोपर्यंत त्यानें तें भल्या लठ्ठलठ्ठ पायांचे व लांबच लांब ओघळलेल्या नाकाचें अंजनपर्वतप्राय एकदंती धूड दोन्ही डोळ्यांनीं

पाहिलें नाहीं, तोंपर्यंत सहस्र पर्याय शब्दांनींही तो वितृष्ण होणार नाहीं. ते शब्द म्हणजे केवळ कलेवरें होत; त्यांत चैतन्य कसें तें नाहीं; तें चैतन्य अनुभवांत आहे. तारायंत्राच्या तारेचे दहा कोस पुरेंसे वेटाळें असलें आणि तें कितीहि भक्कम खांब उभारून ताणिलें तरी सुतळीचा दोरा किंवा वादी याचीच किंमत त्याला. त्याचा जेव्हां विद्युत् शक्तीशीं संबंध जडेल तेव्हां त्यांत चैतन्य खेळूं लागेल. म्हणूनच सद्गुरु नृसिंहसरस्वतींनीं म्हटलें कीं, " अमोलमोल तो **अनुभव** । यया व्यतिरिक्त सर्व वाव ! " अनुभव मात्र शब्दाचा प्राण आहे. तो मिळतांच शब्द सजीव होऊन तद्गत **सत्ता, ज्ञान,** व **आनंद** म्हणजे शब्दाचें **सच्चिदानंदत्व** ध्यानांत येतें. त्याशिवाय नाहीं.

* * * *

२५०. संसारी लोक हिरा हें बहुमोल रत्न समजतात. विरक्त लोक तो केवळ पाषाण आहे असें म्हणतात, शास्त्रज्ञ लोक तो शुद्ध कॅर्बन नामक वायु आहे असें मानितात. या तिघांत लबाड कोण, म्हणावें ? कोणीच नाहीं. त्याचप्रमाणें कित्येक संसार **सत्य** मानितात. दुसरे त्याची केवळ **प्रातिभासिक सत्यता** कबूल कारि-तात व तिसरे तो **मुळींच नाहीं असें** म्हणतात. यांत कोणीही लबाड नाहींत. सर्वच आपआपल्या भावनेला धरून बोलतात.

* * * *

२५१. पुण्यांत कोणी म्हणतो मी पुष्करणीचें पाणी पितों; दुसरा म्हणतो मी सदाशिव पेठचें हौदाचें पितो. तिसरा म्हणतो मी आपला फडतऱ्यांचे उस्वासाचें पितों. हीं वाक्यें पुण्याविषयीं गैरमाहित अशानें ऐकिलीं असतां त्याला वाटतें कीं हे तीन असामी तीन प्रकारचें पाणी पितात. परंतु अस्सल पुणेंकर जाणतो कीं हीं तीन केवळ ठावकीं किंवा पात्रें निराळीं; बाकी त्यांतून खेळणारा झरा किंवा जिव्हाळा एकच आहे. त्याचप्रमाणें, कोणी म्हणतो ही **न्यूतननें** युक्ति काढिली. हा द्वैतसिद्धांत **मध्वानीं** स्थापला. अमुक शोध **क्षनें** लाविला. व या समजुतीप्रमाणें त्या त्या व्यक्ति स्वकर्तव्याविषयीं अभिमानही धरितात. परंतु जो ज्ञाता आहे त्याला स्पष्ट दिसून येते कीं, हें ज्ञान **न्यूटनचें** नव्हे आणि तें **मिल्टनचें** नव्हे. ह्या भिन्न व्यक्ति केवळ उच्छ्वासस्थानें आहेत. या ब्रह्मांडाचे पोटांतून वाहणारे यावज्ज्ञानप्रवाहाचा उगम एकच आहे; ( **योगोज्ञानं तथा सांख्यं विद्याः शिल्पादि कर्मच । वेदाः शास्त्राणि विज्ञान मेतत्सर्वं जनार्दनात्** ) आणि तो परमात्मा आहे. दबून पाणी राहून नासूं नये म्हणून जसे जागजागीं त्या नळाला उच्छ्वास असतात, तसे ज्यांचे मुखानें ज्ञानाचा स्रोत आपणास बाहेर पडतोसें वाटतें ते केवळ उच्छ्वास होत. हा ज्ञानौघ परमात्म्यानें सृष्ट्युत्पत्तिसमकालच जीवांचे जीवनार्थ निर्माण केला आहे. व तो जगच्चालक काला-

पेक्षेनें त्याची वेळोवेळीं वांटणी करीत असतो. यासाठीं अमुक ज्ञान माझें व तें मी दुसऱ्यांना सांगणार नाहीं असें म्हणणें अन्यायाचें, किंबहुना हरामखोरीचें आहे. सर्वज्ञान ईश्वराचें आहे व त्याचेच प्राण्यांचे कल्याणाकडे त्याचा विनियोग करणें हा त्याचा उद्देश आहे.

२५२. गंगा विष्णुपदापासून उद्भविली त्यामुळें तिला विष्णुपदी नांव दिलें. जन्हूनें तिला मांडीखालीं दाबून धरिलें आणि 'जान्हवी' असा आपले नांवाचा छाप देऊन सोडून दिलें. भगीरथानें तिची उचल केली आणि तिच्यावर 'भागीरथी' असा आपला शिक्का चढविला. वास्तविक ही सगळीच लबाडी. गंगा भगीरथाचीही नव्हे आणि जन्हूचीही नव्हे. निखिल जगत्पावनी आहे. तसेंच यावत् ज्ञान ईश्वराचें.

२५३. काळ्याला काळुंद्रा म्हटलेलें टोंचतें. नकट्याला नाक खाजविलेलें रुचत नाहीं. चोराला चोर म्हटल्यानें संताप होतो. आणि हें पाहून आपण म्हणतों कीं "हें काय? काळ्याला काळें म्हटल्याचा राग कां यावा? आणि असें म्हणून आपण विस्मय करितों. परंतु त्या लोकांना असें कां वाटतें याचा विचार करीत नाहीं; आणि त्यांस दोष देतों. पण विचार करील त्याला असें दिसून येईल कीं 'हीं दूषणें न रुचल्यानें जो रागास येतो, त्याकडे अन्याय बिलकुल नाहीं. कारण तो खरोखरच या सर्व दोषा-

रोपांपासून भिन्न असून धुतले मोत्यासारखा निर्मल आहे, आणि म्हणून स्वभावतःच त्याला हें बावगें बोलणें खपत नाहीं. हा असा कोण म्हणाल तर, " या कलेवराला चेतविणारा किंवा आंतून 'हुंकार' भरणारा अंतर्यामी. जो ऱ्हस्व नाहीं, दीर्घ नाहीं स्थूल नाहीं, सूक्ष्म नाहीं, कानावांचून ऐकूं शकतो, डोळ्यांवाचून पाहूं शकतो, तो."—अर्थातच याला हे काळेपणा, नकटेपणा वगैरे जडदेहाचे दोष लागू नाहींत. आणि ते जर कोणी त्यावर लादूं पाहील तर त्याला ते न सोसणें हा न्यायच आहे.

२५४. पण, या न्यायाचा जो खरा उपयोग करावयास पाहिजे आहे, तो करण्याची हिकमत मात्र थोड्यांचे अंगीं अस-ल्यानें, वर्म सांपडूनही विसरल्यासारखे लोक वागतात; आणि म्हणूनच विपत्ति पावतात. झोंपेंतून चावळतांना " शूं शूं " करणाऱ्या बहुभाषाचें हाड गुजराथी ही जशी शहाण्यांनीं पक्की ओळख धरली, त्याप्रमाणें लोक जर, प्रसंगानें पटलेली आत्मस्वरू-पाची ओळख पक्की धरून तदनुरूप चालतील तर त्यांना नीति-ग्रंथ वाचण्याचें मुळींच कारण नाहीं. म्हणजे, 'चोरांस' चोर म्हणणें खपत नाहीं. ( कारण, वरील बोलांत सांगितल्याप्रमाणें जो तो बोल ऐकतो तो खरोखरच निर्लेप आहे. म्हणून त्यास सदर दूषण खपत नाहीं. ) आतां अशा वेळीं अनायासानें पट लेली जी आपले शुद्धरूपाची खूण हिला धरून चालल्यावर

अनीतीकडे जनाचें पाऊल कां पडेल? परंतु जन ही पटलेली ओळख जाणून बुजून सांडितात आणि आपले व इतरांचे क्लेश वाढवितात!

२५५. स्वयंपाकघरांत दिपवाळीचे तळणाची कढई पडतांच ओटीवरचे खोलींत जर " ठो, ठो, ठो," सुरू होते, तर अशा जातदमेकऱ्यानें तळकटावर यथेच्छ ताव मारून प्राणांशीं गांठ आली असतां वैद्याचे नांवानें शंख करीत उठणें, हें जितपत न्यायाचें, तितपतच वर सांगितल्याप्रमाणें दयानिधि परमात्म्यानें आम्हांस आमचे शुद्धस्वरूपाची निखळ ओळख पटवून दिली असतांही, आम्हीं स्वैर वर्तन करून मग विपत्तींत पडलों असतां देवाचे नांवानें हाक मारणें, न्यायाचें (?) आहे. नुसतें 'चोर' असें म्हठल्यानें जर डोकें उठतें तर प्रत्यक्ष चोरी करूनही आपले सुखाचा बिघाड होऊं नये असें इच्छिणें मूर्खपणाचें नाहीं तर पाजीपणाचें तरी आहे, हें उघड झालें.

२५६. मुंबईस एकदा आगबोटीचे धक्क्यावर गेलों असतां तेथें बंदरांत एक बोट भक्‌भक् धुराचे लोळ सोडीत उभी होती. तिकडे पाहून मनाला वाटलें कीं ही बोट जर कोळसापाणी खाऊनही 'पर-तीर' न गांठतां याच ठिकाणीं भक्‌भक् करीत दीर्घ काळ उभी राहिली तर काय फळ? फक्त पाणी कोळसा फुकट जाळण्या पलीकडे श्रेय नाहीं. त्याचप्रमाणें, आम्ही रोजच्या रोज अन्नपाणी

खाऊन जर 'परतीर' न गांठतां एथचे एथेच भगभग करीत राहिलों तर केवळ या धरणी वरील अन्नपाणी महाग केल्याचें पाप संपादण्या पलीकडे कांहींच सार्थक नाहीं.

२५७. जो पोंहणारा आहे तो पाण्यांत पडून हातानें पाणीच तोडून पाण्यांतून पलीकडे उतरतो, त्याचप्रकारें तुकारामांसारखे कित्येक पटाईत लोक संसारांत शिरूनच संसाराचा पाश तोडितात. आणि सराईत तिरणारा जसा पाण्याचा कंटाळा न करितां उलट नदीला पूर आलेला दिसतांच करमणुकीसाठीं म्हणून हौसेनें आंत उडी घेतो त्याप्रमाणें तुकारामासारखे संसाराचा कंटाळा न करितां उलट त्यांत हौसेनें शिरू पाहतात. "तुका म्हणे गर्भवासी। सुखें घालावें आम्हाशी।"

२५८. ज्या अफाट महोदधीचे वेढ्यानें सांप्रतचा आर्यदेश छाती दडपल्यासारखा बसला, त्याच महाभूताचे कवेंत असलेले इंग्लंड, जपान वगैरे देश हे त्याचें भयानें घरकोंबडे न बनतां त्याचे छातीवरून वाट करून चहूं खंडांत अप्रतिहत संचार करावयास शिकले आहेत. त्याचप्रमाणें ज्या अफाट भवसागराकडे पाहून कित्येक क्षुद्र पुरुषांची भयानें बोबडी वळते, त्या भवसागराला पाहून सत्पुरुष आनंदित होतात, व त्यांत निःशंक क्रीडत राहतात. म्हणून तुकाराम सांगतात " नका त्यजूं दारापोरें। बांधा सोपे माझ्या घरें।." आनंदित होतात इतकेंच नव्हे, तर असल्या

संसारांत आपणास ज्या कोणी घातलें त्यावर, कापुरुषाप्रमाणें[1] डोळे न मोडितां, त्याचे उपकार मानितात, व्यंकटेश स्तोत्रांत देवीदास म्हणतात " मज घालोनि गर्भाधाना । आलोलिक रचना दाखविली । हीच कृतज्ञता बुद्धि सर्व संसारी जीवांची असावी.

२५९. हि-यानेंच हिरा तोडितात. कांट्यानेंच काटा काढितात त्याचप्रमाणें कर्मानेंच कर्मबंध तोडणें किंवा संसारानेंच संसारोच्छेद करणें हें अशक्य असण्याचें कारण नाहीं. पण, तें कसें तें सद्गुरुमुखानें समजलें पाहिजे.

1 क्षुद्र मनुष्यांप्रमाणें.

समाप्त.

व व्यावहारिक विचार भिन्न पण समंजस वाचकांस पटल्याशिवाय राहणार नाहींत. मराठी भाषेचें शुद्ध व सांप्रदायिक स्वरूप व गंभीर तात्त्विक विचार यांचे अधिक सहृदयाल्हादक संमेलन माझ्या अन्यत्र पाहण्यांत नाहीं. 'बोल' लहान लहान असून विषयही भिन्न भिन्न असल्यामुळे व त्यांस मनोहर वाग्वेश मिळाल्यामुळें ते वाचतांना कंटाळा मुळींच येत नाहीं. उलट ग्रंथकारांचे सूक्ष्म अवलोकन, त्यांचें अनेक विषयांचें प्रणयन, पौरस्त्य व पाश्चात्य तत्त्वज्ञानांचा त्यांच्यावर झालेला संस्कार इत्यादि गोष्टी मनांत येऊन त्यांच्या संबंधानें सप्रेम आदर उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीं. सारांश '**खडे बोल**' हा ग्रंथ सर्व अंगांनीं सुंदर आहे. या पुस्तकापासून बहुश्रुतपणा, बोध व उच्च प्रतीची करमणूक यांचा लाभ वाचकांस होण्यासारखा आहे. अगदीं गरीब विद्यार्थ्यालासुद्धां हें पुस्तक सहज घेतां यावें याकरितां या अमोल पुस्तकाचें व्यावहारिक मोल अत्यल्प म्हणजे ६ आणे ठेविलें आहे. मराठी वाचतां येणाऱ्या प्रत्येक माणसानें व विशेषतः परामर्थाची ज्यांना अपेक्षा आहे अशा वयस्क पेन्शनर व सुखवस्तु गृहस्थांनीं हें पुस्तक संग्रहाला अवश्य ठेवावें अशी त्यांस आग्रहपूर्वक सूचना आहे.

**गोविंद वासुदेव कानिटकर** बी. ए. एल एल. बी:—वर माझे मित्र वे०शा. संपन्न रा. रा. लक्ष्मणशास्त्री लेले यांनीं 'खडे बोल' यांवर जो अभिप्राय दिला आहे, त्याचप्रमाणें माझाही अभिप्राय आहे. रा० माधवरावजी मोडक यांच्या बोलांची भाषा शुद्ध व सुंदर आहे यांत संशय नाहीं. या पुस्तकास लोकाश्रय मिळून तें रसिक जनांच्या मनाचे रंजनास कारणीभूत होईल व त्यांच्या आदरास पात्र होईल अशी मला खात्री वाटते.

**प्रो० श्रीधर विष्णु परांजपे बी. ए. श्रीरामदासानुदास—** 'बोल' वाचून फार आनंद झाला. हे प्रत्येक मुमुक्षूनें अवश्य वाचावेत. त्याचे पुढचे भागही लवकरच वाचावयास मिळावे, अशी उत्कंठा लागते.

**वेदांती बाबा गर्दे**—आपले 'बोल' कवीच्या सुभाषितासारखे आहेत. ते चांगले असून मुमुक्षूंनीं ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. पद्यरूपानें लिहिल्यास अधिक उपयोगी होतील.

**नाना पावगीः**—'बोल' फारच गोड, उपदेशप्रद, बहुत रसाळ, एवढेंच नव्हे, तर...तत्त्वबोधानें केवळ थबथबलेलेच दिसतात.

**श्री. आण्णासाहेब देव**—टोपीवाल्याचा बंगला मुंबई—"आपल्या खडे तात्त्विक बोलांची येथें पारायणें होत आहेत व ज्यांनीं ज्यांनीं ते ऐकिले त्यांनीं त्यांनीं ताबडतोब एक एक प्रत खरेदी केली. आतां दुसरा भाग केव्हां छापून होईल इकडे लक्ष्य लागलें आहे."

**रा. रा. फणसळकर, सातारा**—"बोल" फार मार्मिक, प्रचीतीचे अर्थात् बोधप्रद—एका शब्दांत लिहिणें म्हणजे—ते अनर्घ्य (अमोल) आहेत, ते अवश्य संगृहीत करावे.

**प्रो. एम्. एम्. जोशी** एम. ए.—वेदांतासारख्या गहन विषयावर लिहितांनाही विचाराची प्रत्येक लाट स्वतःसिद्ध व परिपूर्ण असून सर्व लाटा एकामागून एक येऊन विचारगंगालहरी एक झाल्या आहेत याचेच कौतुक वाटतें. गहन विचारांना व्यवहारांतील साध्या उपमांचें कोंदण दिल्यानें विशेष शोभा आली आहे.

**प्रसिद्ध भगवद्भक्त विष्णुबोवा जोग**—रा. मोडक यांचे बोल ऐकून त्यांविषयीं आमची आदर-बुद्धि उत्पन्न झाली.

**कै. वे. शा. नारायणशास्त्री गोडबोले**—'बोल' अनुपम आहेत आणि स्वयंस्फूर्तीचे असूनही शास्त्रानुसारी आहेत, हें मोठेंच कौतुक आहे.

**कै. वे. शा. रामशास्त्री गोडबोले**—हंस-बुद्धिना त्वया तात्त्विकान्वितया विद्वदन्तःकरणानन्द-दायिन्या वाक्यावल्या निर्मितं ग्रंथं विलोक्याहं मुदितान्तःकरणोऽभूवम्।

**विद्यावाचस्पति विद्यालंकार महोपदेशक राशिवडेकरः**- आपले ' बोल ' वाचतांना खालीं ठेववत नाहीत व अंतःकरण आनंदमग्न होतें. हे अज्ञानरोगग्रस्तांस अमृततुल्य, जिज्ञासूंस मार्गदर्शक व ज्ञात्यांस साहाय्यकारक असून गभीराशयैकवेद्य आहेत.

**डॉ. ग. कृ. गर्दे एल्. एम्. ॲंड एस्.**-' बोल ' प्रतिभापूर्ण असून भाषा बोधक तशीच वेधकही आहे. हें एक गद्यात्मक काव्यच असून बहुतेक दृष्टांत फार समर्पक आहेत.

**रा. ग. ज. आगाशे बी. ए.**;—' बोल ' चमकदार रत्नेंच आहेत.

**एक वाचक**—' बोल ' वाचून मूळ लेखकाचे परिचयाची उत्कंठा झाली.

**केसरी ता. १३ डिसेंबर १९१०**—बोल मुख्यतः वेदान्तसंबंधीं असून नांवाप्रमाणेंच खडे-ताठ, सरळ व उंच स्वरांतले आहेत. प्रत्येक बोलांत एक एक संपूर्ण व सुंदर कल्पना मांडली असून बहुधा असा एकही बोल नाहीं कीं, ज्यामध्यें एखादा चटकदार दृष्टांत नाहीं. सर्वच बोलांची भाषा प्रौढ व सुसंस्कृत असून काव्यात्मक आहे. मोडकांनीं हा क्रम चालू ठेविल्यास मराठी भाषेला चांगला लाभ होईल !

**रावबहादूर चिंतामण विनायक वैद्य एम्. ए. एल. एल. बी.**—रा. मोडक यांनी लिहिलेले ' खडे तात्त्विक बोल ' वांचून प्रत्येक सहृदय मनुष्याची मान हाललीच पाहिजे असें मला वाटतें. वेदान्ताचे गहन सिद्धान्त व विचार व्यवहारांतील नित्य पाहण्यांत येणाऱ्या दृष्टांतांनीं-या बोलांत-वाचकांच्या मनांवर चांगले ठसविण्याची रा. मोडक यांस हातोटी साधली आहे. या बोलांपासून अज्ञ व सुज्ञ यांस सारखाच आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. हे बोल सर्वांना ग्राह्य आहेत हें मला निराळें सांगावयास नको.

**रा. रा. ल. रा. पांगारकर**—रा. मोडकांचे ' बोल , बदाम गोळ्यांसारखे मिष्ट व पौष्टिक आहेत. मात्र ज्यांचा कोठा मंद असेल, अशांनीं सावकाश चर्वण करून पोटांत उतरविले पाहिजेत. एरवीं पचावयास जड जातील.

**आनंद**—( जानेवारी १९११ ) वेदांतासारख्या तत्त्वज्ञानविषयावर प्रांजल, मार्मिक आणि रसभरित असे हे बोल फारच गोड आणि आल्हाद-कारक आहेत. भाषा सरळ व शुद्ध आहे. * * * या पुस्तकाचे कर्ते रा. महादेव हरि मोडक बी. ए. हे प्रतिभासंपन्न कवि आहेत, तसें वेदांतासारख्या गहन विषयाला सुंदर भाषेनें अलंकृत करण्याचें सामर्थ्यही त्यांचे ठायीं असल्यामुळें सामान्य वाचकांचें मन त्यांच्या विचारतरंगाबरोबर सहजासहजीं वाहत जातें.

**प्रसिद्ध वेदान्ततीर्थ–सदाशिवशास्त्री कान्हेरे**–मुंबई २७-३-१२ हे 'बोल' ऐकून "Books ought to have no patrons but truth and reason" या बेकनच्या उक्तीची आठवण झाली. यांतील दृष्टांत व्यावहारिक परंतु खात्रीबंद. वेदांत-सुलभ जी दुर्बोधता ती कोठेंही आढळत नाहीं. या ग्रंथाला आलेली बहुविध रमणीयता अथपासून इतिपर्यंत शिथिल होत नाहीं. असेंच मनाचें रंजन, कर्णाचें तर्पण व संशीतीचें परिमार्जन करणारे 'तात्त्विक बोल' **अधिक निपजल्यास बरें.**

**श्रीपादशास्त्री देवधर**—( अध्यापक संस्कृत पाठशाळा, सांगली. ) " हे बोल लिहिणारांचें वेदांतज्ञान, बहुश्रुतपणा, साधी पण सफाईदार भाषेची शैली, दृष्टांताचा समर्पकपणा व शब्दव्युत्पत्तिचातुर्य–यांपैकीं कशाचें अधिक वर्णन करावें हेंच समजत नाहीं. पुस्तकांतील मनोवेधक स्थळें देणें झाल्यास सर्व पुस्तकच पुनः उतरून काढावें लागेल. असें पुस्तक **इतक्या थोड्या किंम-तींत** मिळतें हें गरीब जिज्ञासूंचें भाग्यच होय."

**विश्वनाथशास्त्री**—( एल्फिन्स्टन् हायस्कूल मुंबई ) * * " ग्रंथ-कारानें दिलेल्या नानाविध उदाहरणांनीं त्यांचें विस्तीर्ण ग्रंथावलोकन, अगाध-ज्ञान आणि जगत्कल्याणाची परमावधीची लालसा हीं व्यक्त होत आहेत. शिवाय सिद्धपुरुषांच्या तेजस्वी वचनौघावर ग्रंथकाराची एकनिष्ठ भक्ति निदर्श-नास येत आहे. * * ग्रंथ अती रमणीय व विशेष अधिकाराचा झाला आहे."

**श्रीमंत अण्णासाहेब पिंपळखरे**—( कल्याण ) रा. मोडक यांचे रसिकाला वेड लावणारे, मनाला शांति व वैराग्याचा लाभ करून देणारे, अज्ञानाला ऐहिक व पारमार्थिक वाट दाखविणारे हे अमृततुल्य बोल प्रत्ये-काने जवळ बाळगावे.

**भिषग्रत्न पाटणकर**--( आयुर्वेदिक फार्मसी, सोलापूर ) समक्ष म्हणाले "आजपर्यंत मी माझे उशाशीं गीता ठेवीत असें, अलीकडे तिचे जोडीस हे आपले बोल ठेवीत असतो.

**रा. रा. बापुसाहेब जोशी** – ( वकील, मिरज ) म्हणाले "माझें कुटुंब नुकतेंच निवर्तलें; पण आपले 'बोलामुळे' तें दुःख मी विसरलो."

**के० भाऊसाहेब आचार्य**—( सरकारी वकील ठाणें ) "पुस्तक फारच वाचनीय झालें आहे. जुनीं तत्त्वें नव्यारीतीनें लोकसमुदायापुढे मांडणे परिस्थितीमुळें फार अवश्य झालें आहे. ही कामगिरी आपल्या पुस्तकानें फारच चांगली बजाविली आहे. 'बोलाचे' आणखीही अनेक भाग प्रसिद्ध केल्यास जनतेवर उपकार होतील. आपलेसारखे आणखी लेखक निपजतील तो सुदिन."

**रा. रा. ह. मा. भडकमकर बी. ए.** (**प्रोफेसर**, संस्कृत विल्सन कॉलेज मुंबई ) "हें लहान पण उच्च फल प्राप्त करून देणारे पुस्तक वाचिलें * * हे बोल म्हणजे रा. मोडक यांच्या रसपूर्ण व स्फूर्तिजनक रस-नेची उदात्त सृष्टि आहे. * * या पुस्तकाची किंमत अधिकाराप्रमाणे तार-तम्यानें होणारच. परंतु गेला बाजार उच्च मनोरंजनास तरी येथें वाण येणार नाहीं अशी खातरी वाटते."

**रा. रा. केशव लक्ष्मण ओगले बी. ए.** (ओरायनचे भाषांतरकर्ते) "पुस्तकाचीं पानें चाळतांना एकीकडून तें पुरें पुरें म्हणून मनास इशारत मिळत असतांही दुसरीकडून तें पुरें केल्यावांचून रहावलें नाहीं. शृंगारविषयक्षेत्रांत ( आपल्या ) भक्तिरसाच्या पुरांत प्रशम्य दिसतो."......

**ग. रा. चिंतामण निलकंठ जोशी एम्. ए.** ( एल्फिन्स्टन हायस्कूल, मुंबई )

" भिन्नरुची रसिकांही एका समर्याच ' बोल ' कानांही ।

ऐकुनि कौतुकानें गावें ' त्वत्तुल्य बोलका नाहीं ' ॥ "

**ग. रा. विष्णु आप्पाजी कुलकर्णी** ( सोळांकूर, ता. २९।८।१२ )
" मुमुक्षूंतील ' बोल ' वाचून माझ्या मनांत जी पूज्यबुद्धि उत्पन्न झाली ती एकसारखी वृद्धिच पावत आहे. माझाच गोष्ट काय ? पण आपले थोर शील, दृढ विद्याव्यासंग व अधिकारयुक्त ग्रंथकर्तृत्व या तिन्ही नात्यांनीं आपण सर्व महाराष्ट्रीयास वंद्यच आहां. "

**सत्पुरुष श्रीमंत अजूमहाराज** ( पिन्छाडेदेवडी, इंदूर ) ' गेल्या तीस वर्षांत असला लेख आमचे पहाण्यांत नाहीं. लेखावरून कर्त्याचे ठिकाणी अरुणोदय खास झाला आहे. आतां सूर्योदयाबद्दल भ्रांति नको. '

**वे. शा. श्री. लक्ष्मणशास्त्री द्रविड** ( कलकत्ता, संस्कृत कॉलेज):--
स्वस्ति । श्रीमदनवद्यविद्योद्योतविद्योतितदिङ्मण्डलेषुमोडकमहोदयेषु सविनयं निवेदयाेत । श्रीमत्सहितं निबंधमालोक्य अस्मदीयं चेतोऽतितरां प्रीतिभरमवाप। मन्ये एवमेव सर्वेषां विदुषां चित्तानि मायन्ति भवेयुः ।

**महामहोपाध्याय** केशवशास्त्री मराठे ( वाराणशी, ५।८।१२ ) पुस्तक फार उत्तम आहे. भाषा फार रसाळ व गोड आहे. वेदांतासारखा गहन विषयही आपण दर्पणाप्रमाणें स्पष्ट दाखविला आहे. "

**वे० शा० सितारामशास्त्री शेंडे** ( काशी, ब्रह्मघाट ):—

" अतिदुर्बोधनिजस्वरूपतत्त्वं । प्रबुभुत्सोरुपकारकारिणीयम् ।

" वचसां पंक्तिरुदाहृतरूपया । त्रिविधमार्मु ननुसिद्धवार्तिकेव ॥

**वे. शा. बाळशास्त्री दातार** ( श्रीक्षेत्र काशी. ) " आपला ग्रंथ फारच रमणीय आहे. भाषा अति सरळ व दृष्टांत विपुल असल्यानें शंका रहात नाहीं. "

**ब्रह्मचारी,** यज्ञेश्वरशास्त्री बापटः–मोडक महाराज, आपला ग्रंथ मला आत्मानंद प्रकट करून देतो. "मोदकसा गणपतिला देता झाला मला परानंदा."

**रा. रा. रा. वि. बापट** बी. ए. ( दुर्गाघाट काशी. )–"एकाच बैठकींत समग्र ग्रंथ वाचून पाहिल्याखेरीज उठवलें नाहीं."

**रावबहादुर हरि नारायण नेने** ( कल्याण ) "आपले 'खडे बोल' वाचले. ते वाचल्यानें खरोखरच आपल्यापुढें तत्त्वज्ञान साक्षात् खडेंच आहे असे वाटतें. दुसरा भाग लवकर प्रसिद्ध होण्याबद्दल पुष्कळांची उत्कट इच्छा आहे."

**रा. रा. पंढरीनाथ काशिनाथ तेलंग एम्. ए. एल्. एल्. बी.** ( ज्ञानगेह, काशी ) "आपले ग्रंथांत जागोजागीं भक्तिरसानें परिपूर्ण व साधकाची आस्था पूर्णपणें व्यक्त करणारे असेच बोल दृष्टीस पडतात. जगतांत दृष्टीस पडणारे सर्व साधारण दाखले घेऊन सर्व रोख अध्यात्माकडे वळविण्याची आपली हातोटी पाहून आपल्या खोल दृष्टीविषयीं व विचारी स्वभावाविषयीं कोणाचीही खात्री होईल. अशा पुस्तकांची महाराष्ट्रीयांस फारच जरूरी आहे. कारण आमची मनःप्रवृत्ति बहुतेक याच तऱ्हेची आहे."

**पंडित—गुलाबराव महाराज** ( हरदा ) "पुस्तक वांचून मोडकांविषयीं आदरबुद्धि विलक्षण वाढली. [इंग्रजीतून मराठींत रूपांतर झालेल्या वेदांतपुस्तकांपेक्षां हें पुस्तक अनेकपटीनें उत्तम झालें आहे. मोडकांची सरळ भाषा व दृष्टांतशैली इतकी उत्तम आहे कीं, जिज्ञासूचें मन परमार्थाकडे वळल्यावांचून राहणार नाहीं. तातज्ञानेश्वर म्हणतात–झाड ओळखिजे फुलें। मानस ओळखिजे बोलें। त्याचा प्रत्यय येथें येतो. शृंगारिक दृष्टांत फारच समर्पक आहेत. 'आदर' या शब्दाचें निरूपण तर एकाभक्तिसूत्राचे तोडीचें झालें आहे अशा प्रकारचें पुस्तक अभिप्रायार्थ मला मिळालें याबद्दल धन्यता वाटते."

[ बे. व्ह. ट्र. सोसायटीचे ३ सभासदांचे अभिप्राय ]

**अभिप्राय १** "बोल फार मार्मिक, बोधप्रद व सर्वांनीं ध्यानांत, ठेवण्याजोगे आहेत. कांहीं ठिकाणीं शृंगारिक दृष्टांत आहेत, पण तशा दाखल्यां-

शिवाय ब्रह्मानंदाची ओळख पटविणें फार कठीण असल्यानें ग्रंथकारास दोष देण्याचें कारण नाहीं . कमीटीनें बक्षिस दिल्यास अनाठायीं होणार नाही."

अ० नं० २ " These pithy sayings are suggested to the author on account cf his thoughtful and philosophising tendency. There is no objectionable matter, barring a few expressions which rquire rare polish. The book merits patronage.

(हे बोल ग्रंथकर्त्याचे विचारी व तात्त्विक प्रवृत्तीचें फळ आहेत. क्वचित् स्थळीं शब्दांत सुधारणा पाहिजे. बाकी गैर कांहीं नाहीं. ग्रंथ आश्रययोग्य आहे.

अ० नं० ३. These sayings do really go straight home by the incisiveness and vigour of the style as by the force of the reasoning. I have no hesitation in recommending for it a prize.

[ भाषेचा जोर व मार्मिकपणा तसाच मुद्देसुदपणा यामुळे तत्काळ हे बोल वाचकाचे हृदयास जाऊन भिडतात. यांना बक्षिस देण्याविषयीं मी बेहरकत शिफारस करितों. ]

**विद्वद्वर्य. वे. शा. वासुदेव शास्त्री अभ्यंकर** ( संस्कृत अध्यापक फर्ग्युसन कालेज ):—

"श्रीमच्छंकराचार्य, विद्यारण्य इत्यादिकांचे ग्रंथ महामान्य खरे, पण सामान्यांस ते लहान-तोंडीं मोठा घांस असे होऊन गळीं उतरत नाहीत. परंतु रा. माधवराव मोडक यांचे हे तात्त्विक बोल म्हणजे आबालवृद्धांस सारखेच सुखानें गिळितां येणारे बेताचे गोड घांस आहेत. सबब त्यांचा आदर सर्वांनीं करावा. इतकेंच नाहीं तर प्रत्येकानें प्रत्यहीं सवडीप्रमाणें यांतील थोडे तरी घांस घेऊन त्यांचें चर्वण करावें, म्हणजे जीवगतीचे अनेक प्रकारचे भलते मार्ग लोपून जाऊन खरा मार्ग डोळ्यांपुढें चमकूं लागेल."

**रा० रा० विनायक शंकर भागवत,** वकील ठाणें.

I read Mr. Modak's "Khade Tatvik Bol, Part I." I cannot find adequate words to express my feelings of admiration for these as well as the author of them. They are highly welcome in these days of religious awakening. Every one will be glad to possess these gems of thought full of felicitous illustrations, true wisdom and insight. Mr. Modak is an earnest advocate of Vedantism and is a master of the lofty and intricate philosophy of the Vedant. His Bolas are like beams of light illuminating the prevailing darkness. They disclose an originality of thought. They have a magic power of inspiring those who come under their chastening and elevating influence. The highest spiritual truths are expounded by Mr. Modak in simple language with homely illustrations. As they come straight from the heart of the author they strike deep into the heart of the reader. The inspiration lies in their soul-elements. The reader is not merely pleased and fascinated but also ennobled, purified and exalted.

I congratulate Mr. Modak on having succedced in bringing such a difficult subject as the Vedant within the easy com prehension of the general reader and the beginner. None can read these writings without feeling that he is face to face with singularly

original, rich and powerful mind. No earnest aspirant and thoughtful scholar can read them without gaining new light and inspiration. The collection must serve as a guide-book to the educated Indians on the subject of Vedant.

I hope Mr. Modak puts these Hindu ideas into English and thus makes the abstract Advaita living and poetic in every day life. Then these sayings, as I call them, will attract the attention of many of the English-speaking readers. Being impregnate with the strongent spiritual force and power they will surely exert their divine influence in every part of the world. The new light must spread all over the world. In that case Mr. Modak will rank as an apostle of "Aggressive Hinduism."

**डॉ. मोरेश्वर गोपाळ देशमुख.** बी. एस्. सी. एम्. बी.:—

"I have read Mr. M. H. Modak's "Khade Tatvic Bol" or Plain Philosophical Sayings," Part I in Marathi It is a pleasant reading. Deep philosophical truths of Vedant are stated here in plain and simple Marathi with apt illustrations from every-day facts of life. A happy combination of serious thought, close reasoning and simple style of expression is a distinctive feature of this Book and I have no doubt that anybody who will fortunately come across it will find in it copious but interesting matter worth pondering over and digesting.

# खडे तात्त्विक बोल.

## भाग २ रा.

### विक्रीस तयार.

**यांतील विषयः—**

१ परमात्मप्रतीति. २ परमात्म्याची व्याप्ति. ३ ईश्वराचें स्तुतिपात्रत्व. ४ ईश्वराची जरूरी. ५ ईश्वरी न्याय. ६ ईश्वराचें आकलन. ७ गुरुजनांची मान्यता व भावनेचें सामर्थ्य. ८ सद्गुरूची महती. ९ सद्गुरूचे उपकार. १० जीवांची कृतघ्नता. ११ जशास तसें. १२ तीर्थ-क्षेत्र-रहस्य. १३ सगुणोपासनावर्म. १४ विश्वासाची जबरदस्ती. १५ त्रिविध प्रतीति. १६ अद्वैताचें सामर्थ्य. १७ सुषुप्ति व समाधि. १८ उच्च वर्णाची जबाबदारी. १९ वैदिकांचा हट्ट. २० शास्त्र व व्यवहार. २१ आत्म्याचें निर्धर्मत्व. २२ स्त्रीनिंदेचें वर्म. २३ दानांतील रहस्य. २४ सत्यमिथ्यानिवड. २५ निष्काम भक्ति. २६ सुषुप्तीची साक्ष. २७ उलट पहाणी. २८ उलटी भाषा. २९ शास्त्रीय प्रमेयांचें सर्वगामित्व. ३० ईश्वराचें समत्व. ३१ अधिकारी भेदानें भाषाभेद. ३२ सत्पुरुष कां ओरडतात. ३३ दुःखहरणाचे चुकीचे उपाय. ३४ अनन्यभक्ति. ३५ असेल माझा हरि, तर देईल खाटल्यावरी. ३६ शब्दाची थोरवी. ३७ वैराग्याचा खटका. ३८ एकमेवाद्वितीयम्. ३९ स्थितप्रज्ञ. ४० तेच मन. ४१ पितरांना पाणी कसें पोंचतें. ४२ जाणते मूर्ख. ४३ मायेचें समर्थन. ४४ गायत्रीचें पावित्र्य. ४५ अज्ञानाची उत्पत्ति. ४६ द्वंद्वाचा निर्णय. ४७ खरें सुख. ४८ शास्त्रज्ञाची दृष्टि. ४९ नाममंत्राची व्याप्ति. ५० व्यक्ति आणि जाति. ५१ खरी प्रगति. ५२ आमचा विषय-पक्षपात. ५३ मौनमेवोत्तरम्. ५४ अकालज्ञता. ५५ ईशसाक्षात्कार. ५६ विश्व हें काय आहे? ५७ मायातरण. ५८ अहं ब्रह्मास्मि-सर्वं खल्विदं ब्रह्म. ५९ आमची मृत्पिण्डबुद्धिता. ६० निष्काम भक्ति. ६१ प्रार्थनासमाज. ६२ नामांतील चैतन्य. ६३ मनुष्यांत ईश्वर. ६४ मनुष्याचें चतुर्विध कर्तव्य. ६५ जीवाचें किंचिज्ज्ञत्व. ६६ संसाराचा उगम. ६७ खरा उपासक. ६८ ईश्वरावर भार. ६९ चित्तशुद्धीचा अत्यंत सुगम उपाय. ७० पथ्यपालन. ७१ सद्वस्तूचें स्वरूप. इ. इ.

वरील सर्व विषय मागील भागाप्रमाणें बाणेदार दृष्टांतानीं सिद्ध करून दाखविले आहेत. वाचल्यानें कळून येईल.

# राम ृष्ण-वाक्सुधा,

## (प्रथम वृष्टि.)

### लेखक—कृष्णाजी गोविंद किनरे.

स्वामी विवेकानंद यांचे गुरु श्रीरामकृष्ण परमहंस यांनीं आपल्या शिष्यांना व भक्तांना भाषणप्रसंगानुरोधानें जो अमृततुल्य धर्मोपदेश केला त्याचा यांत संग्रह आहे. यांत ज्याचें विवेचन आलें नाहीं, असा एकही धार्मिक प्रश्न नाहीं. तत्त्वें गहन पण विवेचन अत्यंत सुबोध व मनोरम, दृष्टांत व दाखले अगदीं साधे, रोजच्या व्यवहारांतले मौजेचे व मनाला तेव्हांच पटणारे, यामुळें ग्रंथ कादंबरीसारखा रसाळ आहे. इतका सोपा व सामान्य वाचकालाही मनोरम असा धार्मिक ग्रंथ हा मराठींत पहिलाच. चित्रमय जगताचेद्वारें महाराष्ट्रानें या सुधेची लज्जत पाहिलीच आहे, तेव्हां जास्त वर्णन नको. छपाई सुंदर, बांधणी मजबूत, चार सुबक चित्रें. पृष्ठें २८८. किंमत १। रुपाया. ट. ख. निराळा.

## अभिप्राय.

**केसरी**—भाषांतर गोड व कविता त्याहूनही गोड आहेत. पुस्तकाची भाषा साधी, सुबोध अशी असून आंतील मजकूर भाविक लोकांना आनंदजनक व परमार्थ विषयाकडे चिकित्सक दृष्टीनें पाहणारांस एकवार वाचनीय आहे. पुस्तकाचें बाह्यांग चांगलें आहे. **मुमुक्षु**—पुस्तकाचें अंतरंग व बहिरंग चित्तवेधक झालें आहे. रा. किनरे यांची प्रस्तावना व ५२ पृष्ठांचें स्वामींचें मनोहर चरित्रही अत्यंत प्रेमळ झालें आहे. ग्रंथांतील विषयाची तारीफ प्राकृतजनांनीं काय करावी? ती सिद्धाची स्वानुभवाची वाणी आहे. सगुणप्रेम व नामस्मरणाचा उपदेश फार मोलवान् आहे. **आनंद**—हें मूळ एका इंग्रजी

ग्रंथाचें भाषांतर आहे, तरी तें इतक्या सहृदयतेनें आणि अशा रीतीनें झालें आहे कीं, तें भाषांतर आहे असें वाटतसुद्धां नाहीं. पुस्तकांत घातलेलीं पद्यें तर फारच सुरस व हृदयंगम झालीं आहेत. **ज्ञानप्रकाश**—हें मूळ इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर आहे, असें रा. किनरे यांनीं आरंभीच कळविलें नसतें, तर हें भाषांतर आहे असें ओळखूंही आलें नसतें. इतकी या पुस्तकाची भाषा सुबोध व अकृत्रिम आहे. **बालबोध**—अमृततुल्य आहे. पुस्तक संग्राह्य आहे. **इंदुप्रकाश**—रा. किनरे यांचें भाषांतर फार सरळ, अटपशीर व विषयाच्या प्रतिपादनानुरूप स्वाभाविक उठावाचें आणि जोरदार असें झालें आहे. **दीनमित्र**—पुस्तकांत सुधेचे अठ्ठावीसच थेंब आहेत, परंतु गोड आहेत. पुस्तक आंतून बाहेरून गोड आहे. **खानदेशवैभव**—वेदान्तांतील गहनभाग सोप्या व मनोरंजक रीतीनें कळण्यास हें पुस्तक फार उपयोगी आहे. **मराठामित्र**—हे अमृतबिंदु अमृततुल्यच आहेत. यांच्या सेवनानें प्रत्येक मानवी प्राण्यास स्वानंदानुभव प्राप्त होईल. यांत संशय नाहीं. **ज्ञानोदय**—भाषांतर फार छान वठलें आहे. साधु रामकृष्ण यांची विषयप्रतिपादनाची शैली त्यांच्या सोप्या व वहिवाटींतल्या दाखल्यांनीं सुगम झाली असून वाचतांना मनाला आनंद वाटतो. **बकुल**—( ही सुधा ) जशी एखाद्या मोक्षभिक्षूला निःशंक करून तन्मय करील त्याचप्रमाणें एखाद्या प्रणयलोलुप रंगेल वाचकालाही सात्विक आनंदांत पोंहावयास लावील, विवेक-विमूढ मनुष्यास त्याच्या इच्छे-विरुद्ध पण त्याच्याच खुषीनें आत्मानात्मविवेकाच्या मार्गास लावील, इतकी हिची शक्ति आहे; इतकी हिच्यांत जादू आहे. **शुभसूचक**-धर्मासारख्या गहन विषयांतील तत्त्वांचें विवेचन व्यवहारांतील दृष्टांत व दाखले देऊन इतकें सुबोध झालें आहे कीं, तें कंटाळा न येतां कोणालाही सहज समजल्याशिवाय राहणार नाहीं. **सुबोधपत्रिका**—( रामकृष्णाचीं वचनें ) मननीय अशीं वाटतात व त्यांच्याविषयीं आदर वाटूं लागतो. भाषांतर सरस उतरलें आहे. **प्रभात**—भाषा चांगली असून भाषांतर उत्तम साधलें आहे. कविताही गोड आहेत.

## स्वामी विवेकानंद यांच्या

# 'मुलाखती व संभाषणें'

महाराष्ट्र-समाज जागृत व कर्तव्योन्मुख व्हावा या हेतूनें स्वामी विवेकानंदांच्या सर्व व्याख्यानांचें व लेखांचे उत्तम लेखकांकडून सवडीसवडीनें मराठींत रूपांतर करवून तें 'विवेकानंद पुस्तकमाला' या नावानें प्रसिद्ध होत आहे. उपरिनिर्दिष्ट पुस्तक हें या मालेंतील पहिलें असून तें आतां विक्रीस तयार झालें आहे. रामकृष्ण-वाक्सुधेचे लेखक रा. कृष्णाजी गोविंद किनरे यांच्याच हातून या पुस्तकाचें भाषांतर झालें असल्यामुळें तें कसें वठलें असेल, हें निराळें लिहावयास नकोच. आरंभीं स्वामी विवेकानंद यांचें चरित्र दिलें असून 'श्रीरामकृष्ण' व 'विवेकानंद' अशीं दोन सुंदर चित्रेंही घातलीं आहेत.

याचे दोन पोटभाग आहेत,-मुलाखती व संभाषणें. स्वामींचीं मतें व कार्यक्षेत्र समजावून घेण्याकरितां येथील व पाश्चात्य देशांतील वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींनीं त्यांच्या मुद्दाम 'मुलाखती' घेतल्या, त्या वेळीं त्यांच्या प्रश्नोत्तरांत अनेक विषय ओघानें आलेले आहेत. त्याचप्रमाणें त्यांचा मुक्काम कलकत्त्यास असतांना त्यांच्या भेटीकरितां आलेल्या हजारों लोकांनीं त्यांना अनेक प्रचलित विषयासंबंधानें जे अनेक प्रश्न विचारले व त्यांचीं स्वामींना आपल्या अधिकारयुक्त वाणीनें जीं उत्तरें दिलीं, त्यांचा समावेश 'संभाषणें' या भागांत आहे.

शिक्षण, स्त्रीशिक्षण, औद्योगिकशिक्षण, धार्मिकशिक्षण, ब्रह्मचर्य, विवाह, बालविवाह, पुनर्विवाह, जातिभेद, वर्णभेद, गायनशास्त्र, कलाकौशल्य, धर्माचीं सर्व अंगें व उपांगें इत्यादि नानाविषयांवरचीं स्वामींचीं मार्मिक मतें या एकाच पुस्तकांत पहावयास सांपडतील. पृष्ठें ३०० किंमत १ रु. ट. ख. निराळा.

## अभिप्राय

**केसरी**—'मुलाखती व संभाषणें' यांतील भाषा व विचार अत्यंत वाचनीय आहेत. या भाषांतराची भाषा सुबोध, मधुर व मुळांतील स्वारस्य कायम ठेवणारी आहे. आणि हिंदुधर्माची महती कशांत आहे; सद्वर्तन, ब्रह्मचर्य, स्वार्थत्याग, आत्मविश्वास व देशभक्ति यांत काय सामर्थ्य आहे; इंग्लंड व हिंदुस्थान यांनीं एकमेकांपासून काय शिकावें......वगैरे महत्त्वाच्या विषयांवरील उत्कृष्ट विचार या पुस्तकांत आहेत. पुस्तकाचें बाह्यांग सुंदर आहे. **मुमुक्षु**—कागद, छपाई, बाइंडिंग वगैरे उत्कृष्ट केल्याबद्दल जसें रा. भट आणि मंडळींचें अभिनंदन करावेंसें वाटतें; तसेंच भाषांतर सरळ, प्रेमळ व मूळांतील स्फूर्ति कायम ठेवून केल्याबद्दल रा. किनरे यांचे आम्ही सप्रेम अभिनंदन करितों. **इंदुप्रकाश**—रा. किनरे यांनीं भाषांतराचें काम समाधानकारकरीतीनें केलें आहे. त्यांची भाषा गोड, असंदिग्ध व प्रेमळ आहे. देशाच्य पारमार्थिक उन्नतीसाठीं अशा प्रकारच्या तेजस्वी ग्रंथांची फार आवश्यकत आहे. **बालबोध**—विषयांचा निवड फार चांगली आहे. अत्यंत बोधप्रद विचारणीय आहे. भाषा चांगली, शुद्ध, गोड व रसाळ आहे. **पंचमजॉर्ज विजय**—साध्या व मुळास सोडून नसलेल्या गोड भाषेंत हें भाषांतर के असल्यानें महाराष्ट्रवाचकांवर खरोखर मोठे उपकार झाले आहेत. पुस्तक अंत बाह्य चांगले आहे. **ज्ञानोदय**—एकंदरींत धर्माचा शास्त्रीयरीत्या उलगा करण्याची ( स्वामींची ) रीत फार चांगली आहे व ती सर्वांस मान्य करण्या हरकत नाहीं. हिंदुधर्माचें ज्ञान मिळविण्यास हें पुस्तक साधनीभूत होईल **शुभसूचक**—मुलाखतींत व संभाषणांत अनेक विषयांचा ऊहापोह झा असून लोकांनीं विचारलेल्या अनेक शंकांचें समाधान स्वामींनीं फार मार्मिकप केलेलें आहे. **विविधज्ञानविस्तार**—पुस्तकाची भाषा विषयास अनुरूप अ असून सुबोध आणि सरळ आहे. **ज्ञानप्रकाश**—भाषांतर फार चांगलें साधलें आ

**भट आणि मंडळी, पुणें-सिटी.**